गुरुवर्य विनायक वासुदेव ऊर्फ
भाऊसाहेब आजगांवकर
यांस
आदरपूर्वक अर्पण.

# रसग्रहण

ललितवाङ्मय—कथावाङ्मय हा मानवी जीवनाचा इतिहास आहे. व्यक्तीच्या जीवनांतील आशा, आकांक्षा, वैचारिकता आणि वैकारिकता यांच्या पायावर कथावाङ्मयाची उभारणी केली जाते. एकाद्या व्यक्तीच्या चरित्रांत त्याच्या महत्त्वाकांक्षेची अन् त्याच्या लौकिक जीवनाची कल्पना येईल; पण चरित्रनायकाच्या अंतरंगाची त्यांत पुसट छायाही आढळणार नाहीं. चरित्रलेखकाला चरित्रनायकाच्या अंतरंगावर स्पष्ट प्रकाश पाडण्याचें स्वातंत्र्य नसतें अन् स्वतः जर कुणा मोठ्या व्यक्तीनें आपलें आत्मचरित्र लिहिलें तर तो आपलें अंतरंग स्पष्टपणें व्यक्त करूं शकतोच असें नाहीं. कारण आपल्या खाजगी जीवनाची सार्वजनिकरीत्या चर्चा व्हावी असें कुणालाच वाटत नसतें. म. गांधी यांनीं असंदिग्ध भाषेंत आपलें आत्मचरित्र लिहिलें आहे, पण त्यांच्याही जीवनांत अशा कांहीं गोष्टी घडल्या असतील कीं त्या त्यांना आपल्या आत्मचरित्रांत लिहिणें अशक्य वाटलें असेल. पं. जवाहरलाल यांचें जीवन केवढें विशाल अन् विविध आहे! पण राजकीय जीवनाखेरीज या विशाल जीवनाचा त्यांच्या आत्मचरित्रांत मागमूस तरी सांपडतो का?

समाजांतील सामाजिक, राजकीय चळवळींचा इतिहास, मोठ्या व्यक्तींचीं चरित्रें अन् आत्मचरित्रें यांत मानवी जीवनाचें अंतरंग आढळणार नाहीं. डॉ. पट्टाभिसीतारामय्या यांनीं काँग्रेसचा इतिहास अगदीं सुसंगतपणानें लिहिला आहे. काँग्रेसनें कायदेभंगाच्या चळवळीला सुरवात केल्यापासून घडलेल्या बारिकसारिक हकिकतींचा त्यांत इतिहास आहे. पण त्या चळवळींत भाग घेतलेल्या व्यक्ति, त्या व्यक्तींवर प्रेम करणारी किंवा अवलंबून असणारीं त्यांचीं आप्त अगर स्नेही मंडळी, त्यांच्या प्रियतमा किंवा प्रियकर यांच्या जीवनांत कायदेभंगाच्या चळवळीनें कोणतीं आंदोलनें घडवून आणलीं याचा इतिहास काँग्रेसच्या इतिहासांत आढळणें शक्य आहे का? या मानसिक आंदोलनाच्या इतिहासाचें कथावाङ्मय हेंच माध्यम आहे आणि म्हणूनच 'Literature is a social weapon that it expresses the struggle' असें कार्ल रॅजेकनें मत व्यक्त केलें आहे.

गेल्या वीस पंचवीस वर्षांपूर्वीच्या ललितवाङ्मयाचें जर अवलोकन

केलें तर वास्तवपरिस्थितीची अन् त्या वाङ्मयाची फारकत असलेली दिसून येते. अर्थातच हरिभाऊ आपटे यांचे वाङ्मय याला अपवाद आहे. समाजातील व्यक्तींच्या जीवनापासून सर्वस्वी अलिप्त असलेलें करमणुकप्रधान–वाङ्मय लिहिण्यांतच लेखकांनीं आपलें बुद्धिसर्वस्व खर्च केले. कारण मागणीप्रमाणें पुरवठा हेंच लेखकानीं ध्येय ठेवलें. व्यक्तींच्या जीवनांत जे बरेवाईट प्रसंग घडून येतात त्यांची दाहकता कमी करण्यासाठीं लोक नाटक–सिनेमा पहायला जातात— कथावाङ्मय वाचतात. त्याना जीवनातलं खरें सत्य करमणुकप्रधान–वाङ्मयातून समजून घ्यायचें नसते. त्याना सौख्याच्या आभासमय परिस्थितीचा उपभोग घ्यायचा असतो. अशा कल्पनेनें प्रेरित होऊन कथालेखकानीं वास्तवपरिस्थितीशीं विसंगत असलेलीं दृश्यें आपल्या कथावाङ्मयात रेखाटायला सुरवात केली आणि म्हणूनच वास्तव जीवनावर झगझगीत प्रकाश पाडणारीं नाटकें इब्सेननें लिहायला प्रारंभ केल्यानंतर क्लेमण्ट्, स्कॉट् सारख्या जुन्या दृष्टिकोणाच्या विद्वान् टीकाकारांनीं इब्सेनविरुद्ध काहूर माजविलें.

सोव्हिएट–क्रान्तिनंतर रशियामधें वाङ्मय निर्मितीचे जे पंचवार्षिक प्रयोग करण्यांत आले त्यावेळीं रशियन वाङ्ममयाला वास्तवतेचें वळण लागलें. रशियनक्रान्तिपूर्व घडलेल्या घडामोडी, क्रान्तीसाठीं केलेले प्रयत्न अन् क्रान्तिनंतरची परिस्थिति यांचा इतिहास ललित वाङ्मयामध्यें चित्रित केला गेला आणि या प्रयोगाचा जगाच्या वाङ्मयावर परिणाम झाला. या रशियन प्रयोगामुळें वाङ्मयाला हिणकसपणा आला असें कित्येक टीकाकारांचें म्हणणें आहे. हे म्हणणें एक वेळ गृहित धरलें तरी या प्रयोगानें लेखकांना जी नवी दृष्टि आली ती कमी मोलाची आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं.

रशियातील समाजवादी विचारप्रणालीप्रमाणेंच रशियन वाङ्मयप्रकाराला जगांत जी लोकप्रियता मिळाली आणि त्यांतील वैचारिकतेनें लेखकांवर जे आघात झाले त्याची पडछाया मराठी वाङ्मयावरही पडल्याखेरीज राहिली नाहीं. मराठींतील श्रेष्ठ अन् ज्येष्ठ कादंबरीकारांनीं रशियन धर्तीच्या राजकीय कादंबऱ्या लिहायला प्रारंभ केला आणि कांहीं अंशीं

त्यांत त्यांनीं यशही मिळविलें. पण सोव्हिएट लेखक प्रचाराच्या हेतुनें जशा पद्धतीच्या कलात्मक लघुकथा लिहितात तशा लिहिण्याचा बऱ्याच जुन्या नव्या लेखकांनीं प्रयत्न केला आहे आणि त्या लेखकांत प्रस्तुत कथा-संग्रहाचे लेखक वि. द. चिंदरकर यांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे.

ब्रिटिश किंवा बऱ्याच प्रमाणांत अमेरिकन लघुकथांमध्यें जो पाल्हाळिकपणा आढळतो त्याचा मागमूसही आधुनिक रशियन कथांमध्यें आढळत नाहीं. दोन किंवा तीन पृष्ठांची कथाही अत्यंत कलात्मकतेनें लिहिली जाते. या संग्रहांतील चिंदरकरांच्या कथाही याच नमुन्याच्या आहेत. ' उनाड स्त्री ' अन् ' सावत्र बहीण ' या दोन कथा वगळल्या तर बाकीच्या सर्व कथा दोन किंवा तीन पृष्ठांपेक्षां जास्त मोठ्या नाहींत; असें असूनही कथानकाचा अविष्कार अन् कलेचा विकास त्या कथांमध्यें पूर्णपणें झालेला दिसून येतो. चिंदरकरांच्या कथा वाचून 'लेटर' या नांवाच्या एका उत्कृष्ट रशियन कथेची मला आठवण झाली. ही कथा अवघी दोन पृष्ठांची आहे. त्या कथेचें कथानक थोडक्यांत असें आहे.—एक तरुण जोडपें असतें. तरुण कामगारपुढारी असतो. बायको मात्र अशिक्षित असते. तिला लिहायला वाचायला येत नसतें. तिचें आपल्या नवऱ्यावर आत्यंतिक प्रेम असतें. पण नवरा रात्रीं बेरात्रीं बाहेर जात असतो. त्याच्या घरीं येणाऱ्या मैत्रिणी त्याच्याशीं नेहमीं कुजबुजत असतात. तो त्यांच्याशीं तासन् तास एकांतात बोलत बसतो, याचें तिला वैषम्य वाटते. नवऱ्याच्या वागणुकीविषयीं तिला संशय वाटूं लागतो. एके दिवशीं तो कॉम्रेड तरुण घरीं नसतां त्याला त्याच्या एका मैत्रिणीचें खास दूताकरवीं पत्र येतें. तें पत्र कुणी पाठविलें हें ती विचारून घेते अन् तें एका स्त्रीनें पाठविलेलें पत्र आहे असें ज्यावेळीं तिला कळतें त्यावेळीं ती जळफळते. तिला वाचायला येत नसते. पहिल्यानें तिला वाटतें, कुणा तरी शेजाऱ्याकडून हें पत्र वाचून घ्यावें. पण लगेच तिच्या मनांत विचार येतो, आपल्या पतीचे प्रणयचाळे शेजाऱ्यापाजाऱ्यांना कळले तर तें लांच्छनास्पद आहे. तिच्या जिवाचा कोंडमारा होतो. त्या पत्रांतील मजकूर समजून घेण्याची तिची जिज्ञासा तृप्त होत नाहीं. या अतृप्ततेच्या निराशेनें ती लिहायला वाचा-

यला शिकूं लागते. तिचा हा उत्साह पाहून तिच्या नवऱ्यालाही आश्चर्य वाटतें. सहासात महिनें लोटतात आणि साधारण तें वाचायला यायला लागल्यानंतर ती लपवून ठेवलेलें पत्र बाहेर काढते अन् वाचते. पण त्यांत काय असते ? ' आज रात्रीं पार्टीची गुप्त बैठक आहे. तूं अवश्य ये. ' असाच त्या पत्रांत मजकूर असतो. त्यांत प्रेम नसतें अगर प्रेयसीच्या गुप्त भेटीची वेळ नसते. अन् इथेंच त्या गोष्टीचा लेखकानें शेवट केला आहे. पण एका अशिक्षित स्त्रीच्या मनोभावनेचें चित्र लेखकानें अत्यंत कलात्मकतेनें चित्रित केलें आहे.

या संग्रहातील चिंदरकरांच्या सव्वीस कथांपैकीं ' उनाड स्त्री ' अन् ' सावत्र बहीण ' या दोन कथा वगळल्या तर बाकीच्या कथा वरील कथेप्रमाणें हृद्य आहेत. त्यांच्या कथांचें दुसरें वैशिष्ट्य म्हणजे मानवी जीवनांतील विविध अनुभवांचा अन् प्रसंगांचा त्यांत आविष्कार आहे अन् विविध व्यक्तींच्या स्वभावाचा त्यांत विकास आहे. कथासंग्रहांतील पंचवीसही कथा भिन्न भिन्न प्रसंगांवर अन् व्यक्तिविशेषांवर आधारलेल्या आहेत. एका कथेंतील प्रसंग किंवा व्यक्ति यांचें दुसऱ्या कथेंत यत्किंचितही साम्य आढळत नाहीं. या कथासंग्रहांतील भिन्न भिन्न स्वभावाच्या व्यक्ती, विविध प्रसंग अन् वैचित्र्यपूर्ण कथानकें पाहिलीं म्हणजे असे वाटतें, कीं कल्पनासृष्टींतलें हें जग नाहीं. वास्तवपरिस्थितीच्या पायावर आधारलेली ही सृष्टि आहे. चिंदरकरांनीं आपल्या, मित्रांच्या अन् परिचितांच्या जीवनांतील प्रसंगांच्या अनुभूतीनेंच हें कथाचें विश्वनिर्माण केले आहे.

गेल्या शतकांत मराठी वाङ्मयांत अनेक श्रेष्ठ आणि कनिष्ठ लेखकांच्या कथासंग्रहाची भर पडली आहे. त्या कथासंग्रहांत अनेक सर्वोत्कृष्ट कथा आहेत. पण चिंदरकरांच्या कथासंग्रहांत अद्यावत् आधुनिक पद्धतीच्या जशा सर्वच कथा सांपडतात तशा त्यांत क्वचित्च असतील. फडके–खांडेकर प्रभृति लेखकांचे श्रेष्ठत्व, प्रतिभा, बुद्धिवैभव अन् विशाल अनुभव याची मला पूर्ण जाणीव आहे. लेखनांतील त्यांचें अष्टपैलुत्व आणि वडिलकीकडेही कानाडोळा करतां येण्यासारखा नाहीं. पण या सर्व गोष्टी ध्यानीं घेऊनही मी असें अभिमानानें म्हणूं शकतों,

कीं आधुनिक लघुकथेच्या लेखनशैलींत चिंदरकरांनीं त्यांना मागें टाकलें आहे. याचा अर्थ चिदरकरांच्या मानानें ते सामान्य लेखक आहेत असें म्हणण्याचा माझा हेतु नाहीं, तेवढा माझा अधिकार नाहीं अन् तितका मी बेजबाबदारही नाहीं. पण एवढेंच म्हणायचें आहे, कीं आधुनिक लघुकथेच्या तंत्राचा चिंदरकरांनीं गाढ व्यासंग केला आहे.

चिदरकर हे माझे जिव्हाळ्याचे स्नेही अन् समव्यवसायी आहेत-त्यांनीं प्रस्तावना लिहिण्याचा प्रश्न ज्यावेळीं उपस्थित केला त्यावेळीं ते विनोदानें तसें बोलत असावेत असा माझा समज झाला; कारण प्रस्तावना लिहिण्याइतका वाङ्मयीन दर्जा अजून मी मिळविलेला नाहीं याची जशी मला जाणीव आहे तशी ती त्यांनाही जाणीव आहे. माझ्यापेक्षां वयानें जसे ते ज्येष्ठ आहेत तसे कथालेखक या नात्यानेंही ते श्रेष्ठ आहेत. पण रसग्रहण करतांना वयाचा, दर्जाचा अन् विद्वत्तेचा विचार करायची आवश्यकता नाहीं असा विचार करून मी प्रस्तावना लिहिण्याचें कबूल केले अन् चिंदरकराच्या वाङ्मयासंबंधीं मी जें माझे मत व्यक्त केलें त्यात मैत्रीचा मिंधेपणा नाहीं याची प्रतीति कथा वाचल्यानंतर वाचकांना अन् टीकाकारांनाही पटून येईल. चिंदरकराच्या माझ्या मैत्रीला आता इतकें परिणत स्वरूप आलें आहे, कीं त्यांची मी स्तुति केली म्हणून ते माझ्यावर आणखी जास्त प्रेम करणार नाहींत अन् टीका केली तरी वैषम्य वाटून घेणार नाहींत.

चिंदरकराच्या वाङ्मयांत प्रणयाची उत्तानता नाहीं. पण भावमयता मात्र आहे याची जाणीव 'भूक' ही त्याची एकच कथा वाचल्यानें दिसून येईल. शृंगारिक प्रसंगांच्या भडक वर्णनाचा त्यांच्या कथांत अभाव आहे. पण प्रणयी व्यक्तीच्या जीवनाचा अन् भावनांचा मात्र त्यांत वास्तवपूर्णतेनें केलेला आविष्कार आहे. स्त्रीच्या देह—सौंदर्याचे उत्तेजक अन् उद्दीपक वर्णन म्हणजेच कलेचें प्रगटन अन् आविष्कार हा चिंदरकरांच्या कलेचा हेतु नाहीं. व्यक्तीच्या जीवनात अन् भावनांत अवगाहन करणें हें त्यांच्या कलेचें ध्येय अन् वैशिष्टय आहे. बंडखोर मन, शेजारची मुलगी, कुतुबमिनार, भूक, कवीचे हृदय, प्रभृति कथांमधें त्यांनीं नायक—नायिकांच्या प्रणयलालसेचें चितारलेलें

चित्र किती संयमपूर्ण आहे! आधुनिक युगांत बुद्धीच्या विकासामुळें व्यक्तीच्या जीवनांत संयमाला महत्वाचें स्थान मिळालें आहे. ही वास्तव परिस्थिति डोळ्याआड करून आपल्या कल्पनेप्रमाणें वस्तुस्थितीशीं विसंगत असलेल्या प्रणयाचे चाळे आपल्या नायिकांना करायला लावण्याची मोठी खोड मराठी कथालेखकांत बोकाळली आहे. पण यापासून चिंदरकर पूर्णपणें अलिप्त आहेत. वैकारिक भावनांचा माणसाच्या जीवनावर मोठा पगडा असतो, वैकारिक भावना अतृप्त राहिली तर माणसाच्या जीवनावर त्याचा अनिष्ट परिणामही होतो याची चिंदरकरांना जाणीव आहे हें त्यांच्या 'भूक' या कथेवरून दिसून येण्यासारखें आहे. पण वैकारिकतेच्या उच्छृंखलपणांतच मानवी जीवनाची सार्थकता आहे असें मात्र त्यांना वाटत नाहीं.

चिंदरकर वृत्तीनें काव्यात्मक आहेत हें त्यांच्या दोन मेघ, विशाल जीवन, भुईचांफा प्रभृति रूपककथावरून दिसून येण्यासारखें आहे. पण मध्यम वर्गाप्रमाणेंच खालच्या वर्गाच्या भावनांशीं समरस होण्याची त्यांचीं वृत्ति आहे. उपकारीं माणसें, अभिमान, खारवा प्रभृति कथा वाचतांच हें प्रत्यंतर येतें. त्यांच्या कथांत बालकाची निर्व्याजता, तरुण–तरुणांच्या भावनांची मादकता आणि प्रौढाची उदात्तता दिसून येतें. यांची बालदृष्टि, कवींचें हृदय आणि त्यांनीं वेडेंच राहायचें ठरविलें या कथा वाचतांच जाणीव होण्यासारखी आहे. चिंदरकरांच्या कथांमध्यें जी विशालता अन् विविधता आहे त्याचें सारें श्रेय त्यांच्या जीवनांतील अनुभवांनाच आहे. कथानक, प्रसंग अन् व्यक्ती यांच्या वैचित्र्यानें भरलेल्या उत्कृष्ट कथा विविध अनुभवाखेरीज लिहितां येणार नाहींत. भिन्न भिन्न व्यक्तींच्या परिचयाची, त्यांच्या जीवनाचा सूक्ष्म अभ्यास करायची चिंदरकरांना जी संधि लाभली आहे ती बहुमोल आहे आणि म्हणूनच त्यांच्या कथांमधें जीवनाच्या जिवंत झऱ्याची झुळझुळ ऐकूं येते.

'लोकमान्य' कचेरी<br>
फोर्ट मुंबई.<br>
८–१२–१९४०

**ह. वि. देसाई.**

# दोन मेघ : १

आकाशांत मेघांचा प्रचंड गडगडाट होऊं लागला. इतकी प्रचंड मेघगर्जना यापूर्वी कोणीहि ऐकिली नसेल.

दोन मेघ मोठ्यानें ओरडून एकमेकांना सांगत होते :

" मी मोत्यानें भरलेला शिंपला होईन. कुणीतरी श्रीमंत पतीची राणी मोत्यांचा हार करून आपल्या कंठांत मला सदैव ठेवील ! "

" नि मी लहानसाच का होईना, झरा होईन. शेत पिकवीन. शेतांत मोत्यांची रास करीन ! "

वरुणाच्या कानावर त्यांचें बोलणें गेलेंच होतें. त्यानें त्यांच्या इच्छेप्रमाणेंच घडवून आणलें.

त्या दिवशीं मुसळधारांचा पाऊस पडला. जणुं आतां जगबुडीच होणार असें सर्वांना वाटलें.

त्या पावसानें एक सुंदर तलाव निर्माण झाला. आणि तलावांतील एका डोहांत एक पांढऱ्या शुभ्र मोत्यांनीं भरलेला शिंपला जन्माला आला.

पावसाळा गेला आणि उन्हाळा आला. सगळीकडे शुष्क झालें होतें. पण तो तलाव कसा आकाशासारखा भव्य दिसत होता. पांढऱ्या आणि तांबड्या कमलांनीं तो फुलून गेला होता. अनंत पक्षी त्यांत येऊन विहार करीत होते.

पाण्याचा दुष्काळ पडतांच शेतकरी तलावाचें पाणी पाटानें नेऊन शेत पिकवूं लागले. बायका घागरी भरून डोक्यावरून पाणी नेऊं लागल्या. तान्हेलेलीं गुरें दुपारच्या प्रहरीं येऊन आपली तहान भागवूं लागलीं.

उन्हाळ्याच्या ऐन भरांत फलझाडांना बहर आला होता. चारी कांठचीं शेतें धान्यभरानें डोलत होतीं. तलावाच्या बाजूला जणुं नंदन-वनाची शोभा आली.

हें सारें दृश्य पाहून तलावाला धन्यता वाटली. साऱ्या गांवचें आपण जीवन आहोंत या कल्पनेनें त्याच्या अंगावर जणुं मूठभर पाणी चढलें.

आनंदाच्या उन्मादानें त्याच्या अंगावर सुखकारक शहारे येऊन पाण्यात प्रचंड खळबळाट झाला.

शिंपला डोहांत तळाला खुशाल पडून विचार करीत होता, "अजून कसा मला कोणी काढून नेत नाहीं?" त्यानें आज कित्येक दिवस वाट पाहिली पण कोणी आला नव्हता.

त्याच्या कानीं पाण्याचा खळबळाट पडतांच त्याला आश्चर्य वाटलें. तो विचार करूं लागला. तलावाला एवढा आनंद कसला झाला आहे?

"भाऊ, काय झालं रे, एवढा भुरकटलास कां?"

"वर तरी येऊन पहा!" तलावानें उत्तर केलें. शिंपला हळू हळू पाण्याच्या पृष्ठभागावर आला. त्यानें सभोंवार दृष्टि टाकून पाहिलें.

त्याला वाटलें, शेतांत जणूं मोत्यांची रास पडली आहे. लोक तलावांतील पाणी सारखें भरून नेत होते. सगळीकडे हिरवें गार गार गार.

"भाऊ केवढें तुझें हें वैभव? मला एवढी कल्पना नव्हती..."

तलाव नुसता गालांतल्या गालांत हंसला.

"नि माझ्याकडे अजून कुणींच ढुंकून पाहात नाहीं. मी तुझ्या-सारखाच तलाव झालों असतों..." शिंपल्याला गहिंवरून आलें.

त्याच्या डोळ्यांतून मोत्यांचे अश्रू घळघळा वाहूं लागले.



# उनाड स्त्री : २

मोटरींत बसल्यावर तिनें इतक्या जोरानें दार ओढून घेतलें कीं त्याच्या आवाजानें ड्रायव्हिंग करायला बसलेल्या घन:शामांनीं मागें वळून पाहिलें. त्यांनीं मनांत जाणलें कीं, राणीसाहेबांचें कांहींतरी आज बिनसलें आहे. तिचा आरक्त झालेला गौरवर्ण, भालप्रदेशाच्या मध्य-भागीं पडलेली बारिकशी आठी आणि जोरानें हालणारें वक्षस्थळ पाहून त्यांचा तो तर्क चुकीचा नव्हता हें उघड दिसत होतें.

मोहिनी खरोखरच अस्वस्थ झाली होती.

घन:शामांनीं पुन: एकदां मागें वळून तिच्याकडे पाहिलें.

ती कांहींच बोलत नाहीं असें पाहून त्यांनीं मोटर चालू केली आणि हळूच विचारलें, ‘ मेट्रोला जायचं ना ? ’

मोहिनीनें उत्तरादाखल नकारदर्शक फक्त मान हालविली.

तिच्या नकारानें त्यांना आश्चर्य वाटलें.

त्यांनीं मनांत खूणगांठ बांधली कीं, आजचा प्रकार कांहीं औरच आहे. त्या प्रमत्त मानिनीला समजविण्याचे प्रसंग त्यांच्यावर कांहीं पूर्वी आले नव्हते असें नव्हे, पण आजचा प्रकार कांहीं वेगळाच आहे असें त्यांना वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

‘ राणी, आजचं पिक्चर सुंदर आहे अगदीं ! ’

त्यानीं पुनः एकवार तिच्याकडे पाहिलें,‘ मग जायचं सिनेमालाना ?’

‘ नाहीं जायचं ! ’ मोहिनीनें थोड्या तिरस्कारानेंच पण जोरानें उत्तर दिलें.

तेव्हां मात्र त्याचा नाइलाज झाला.

त्यांनीं आपली मोटर तडक घराकडे वळविली.

मलबार हिलवर राहणाऱ्या आपल्या एका मित्राच्या आग्रहावरून त्याला भेटण्यासाठीं घनःशाम आणि मोहिनी गेलीं होतीं. कुंभकोणम् बँकेच्या मुंबई शाखेचा तो मित्र मॅनेजर होता. मलबार हिलवर एका सुंदर बंगल्यांत तो रहात होता.

त्याचा तो बंगला आणि त्याहून आकर्षक अशी त्या बंगल्यांतील मांडणी, आणि उंची उंची फर्निचर पाहून मोहिनीला अतिशय आनंद वाटला.

आणि त्या बंगल्यांत रहाणाऱ्या मालकिणीचें असामान्य रूप पाहून तिला असूया वाटल्यावांचून राहिली नाहीं.

इकडल्या तिकडल्या गोष्टी झाल्यावर त्या मालकिणीनें आपला तान्हुला बाळ आणून मोहिनीजवळ दिला.

त्याला आपल्याजवळ घेतांना त्याचा जो पहिला स्पर्श मोहिनीला झाला त्यानें ती दचकली. आपल्या हातांतून तो गळून पडतो कीं काय असें तिला वाटलें. तिनें त्याला सावरलें. बोटांत शिरलेलें एवढेसें कुसळ माणसाला बेचैन करून सोडतें. तिच्या मनांतही असेंच एक कुसळ रुतून राहिलें होतें. या प्रसंगानें तें शल्य तिच्या मनाला टोंचू लागलें.

एका तान्हुल्याचा गोड चेहरा तिच्या दृष्टीसमोर येऊन उभा राहिला. त्या चेहऱ्याचे डोळे आपल्याकडे उत्सुकतेनें पाहात आहेत आणि त्याचे दोन चिमणे हात आपल्याला जणुं बोलावीत आहेत असा तिला भास झाला.

तिचा चेहरा पांढरा फटफटीत पडला. ओठ सुकून गेले. घशाला कोरड पडली.

हातांतील मुलाला त्याच्या आईकडे देत ती रुक्ष कंठानें म्हणाली, ‘ घ्या बाई आपल्या मुलाला ! ’

त्याच्या आईनें आपल्या बाळाला घेत म्हटलें, ‘ थोड्या दिवसांनीं होईल संवय हो ! ’

ती त्या बाळाचे मुके घेऊं लागली. त्याला आपल्या हृदयाशीं बिलगवूं लागली.

तें दृश्य मोहिनीला पाहवलें नाहीं. पावसाळ्यांत पायाला कुसंरडा डसून शरीराला वेदना व्हाव्या तशागत तिची स्थिती झाली.

तिनें घाईघाईनें त्यांचा निरोप घेतला आणि तडक आपल्या मोटारींत जाऊन बसली.

घनःश्याम कोणत्या तरी महत्त्वाच्या विषयावर आपल्या मित्राशीं गप्पा करीत होते, पण त्यांना त्या अर्धवट सोडून मोहिनीच्या मागें जावें लागलें.

आपल्या घरीं मोटर येतांच मोहिनी लगबगीनें दार उघडून उतरली. तिची परतफेंक इतक्या जोराची होती कीं मोटरींत बसतांनाची स्मृती घनःश्यामाना झाली.

तिला उतरविल्यावर ते तडक सिनेमाला एकटेच निघून गेले.

घरीं आल्याबरोबर तिनें पलंगावर घालून घेतलें. बराच वेळ ती तेथें पडून होती. पण तो मऊ मऊ बिछानाही तिला रुतूं लागला. तिच्या डोळ्यांपुढें एकच चित्र दिसत होतें. त्याची स्मृति तिच्या मनाला अस्वस्थ करीत होती.

मोहिनी उठली. ती समोरच्या कपाटाच्या आरशासमोर जाऊन उभी राहिली. तिनें आपल्या प्रतिबिंबाकडे पाहिलें. तिची वेषभूषा पार चुरगळून गेली होती. कोंमावलेल्या केळीसारखें तिचें लावण्य भग्न केळीसारखें झालें होतें. चापचोपून बसविलेली केशभूषा मोडून गेली होती.

तरीही तिला आपल्या रूपाचा मोह वाटला. ओवळीचीं फुलें सुकलीं म्हणून त्यांचा वास थोडाच नाहींसा होतो ! तशा स्थितींतही तिला आपण सुंदर आहों याचा अभिमान वाटला.

ती आपल्या प्रतिबिंबाकडे रोखून पाहूं लागली.

आणि त्याचवेळीं तिची दृष्टि आरशांत दिसणाऱ्या कॅलेंडरवर गेली.

बाळाला हृदयाशीं बिलगून धरलेल्या एका मातेचा तो फोटो होता. भिंतीवर टांगलेल्या त्या कॅलेंडरचें प्रतिबिंब आरशांत पडलें होतें.

मोहिनीची दृष्टि त्यावर स्थिर झाली. ती विचार करूं लागली, माझ्या शेजारीं असाच माझा दिलीप बाळ असता तर ? माझा बाळ असूनही मला नसल्यासारखा झालाय् !

तिचें हृदय व्यथित झालें.

जड अंत:करणानें तिनें कपाटाचें दार उघडलें; आंतल्या एका खणांतील पत्रांचें पुडकें तिनें बाहेर काढलें.

त्यांतील निरनिराळ्या पत्रांवरून तिनें दृष्टि फिरविली. आणि एका विशिष्ट पत्रावर आपली दृष्टि स्थिर केली. त्या पत्रांत लिहिलें होतें:

'...बोलून चालून उनाड मैना तूं. तुझ्या नादीं लागून मी माझ्या आयुष्याची माती केली. आज वर मान करून लोकांकडे पाहाण्याचें धैर्य माझ्यांत नाहीं. कॉलेजांत अनेक तरुणांना आपल्या रूपाच्या दीपकळीसमोंवार फिरणारे पतंग बनवलेस, आणि बळी पडला माझा. आज याला नादीं लाव, उद्यां त्याला लाव असें तुझें वर्तन. मीच मूर्ख; तुझ्या प्रीतीनें वेडा झालों, आणि लग्नाची बेडी अडकवून घेतली. पण तूं कसली खंबीर. तुझ्यासारख्या उनाड बाईला लग्नाचं बंधन काय कामाचं? तूं तें तोडून मोकळी झालीस त्याच्या वैभवावर भाळून. आपल्या नेहमींच्या-लोकांना नादीं लावण्याच्या-स्वभावास अनुसरून तूं आपल्या जातीवर गेलीसच...बरं झालं. सुटलों एकदां तुझ्यासारख्या बायकोच्या तडाख्यांतून. तुझ्याबद्दल मला वाईट वाटत नाहीं. कारण बोलून चालून तूं उनाड. वाईट वाटतं तें चिमण्या दिलीप बाळाबद्दल- बरं जाऊं दे. आतां त्याचा प्रतिपाळ करणं हेंच माझ्या आयुष्याचं ध्येय...

—व्यंकटराव '

मोहिनीच्या हातून पत्र गळून पडलें.

तिचे पूर्वाश्रमींचे पती व्यंकटराव यांचें तें पत्र होतें. त्यांच्यापासून बडोदें राज्यांत घटस्फोट घेतल्यावर आलेलें अखेरचें तें पत्र होतें.

ती विचार करूं लागली; खरोखरच का आपण उनाड स्त्री आहों? खरोखरच का वैभवाची आपणास हांव आहे?

मोहिनीच्या डोळ्यापुढें तिच्या गतायुष्याचा चित्रपट दिसूं लागला. त्या चित्रपटाला क्षणांत बोलपटाचें स्वरूप आलें. तो जणुं बोलूं लागला,

'मोहिनी, खरंच तूं उनाड नाहींस का? कॉलेजचा उंबरठा ओलांडण्यापासून तूं आपलें स्त्रीचरित्र किती लोकांना दाखविलेंस! किती तरुणांना नादीं लावून आपली चैन चालविलीस! किती तरुणांचे आशा-मनोरे उध्वस्त केलेस! मुंबई इलाख्यांतील एक तरी कॉलेज तुझ्या चरण-धुळीनें पुनीत झाल्याशिवाय राहिलें आहे का? शेवटीं तूं बडोदें गांठलेंस. तेथेंहि तोच प्रकार! आणि जेव्हां का व्यंकटरावांची गर्भश्रीमंती तुझ्या डोळ्यांत भरली, तेव्हां कॉलेजांतील इतर तरुणांचा आशाभंग करून तूं त्यांचीच सहचारिणी झालीस.

'व्यंकटरावांनीं तुझ्यावर किती प्रेम केलें! साऱ्या नातलगांचा विरोध असतांही त्यांनीं त्याला न जुमानतां तुलाच आपल्या पत्नीपदाचा मान दिला. त्या प्रेमळ पतीच्या सहवासांतील दोन वर्षें तुला दोन युगां-प्रमाणें वाटलीं असतील आणि मित्र म्हणून त्यांच्याकडे राहायला आलेल्या घनःशामवर तुझं मन गेलं. त्याचा मुंबईचा महालक्ष्मीवरील भव्य बंगला आणि चेकबुकांतील प्रचंड आंकडा हीं तुला लोभसवाणीं वाटलीं.'

'आणि प्रेमळ पती आणि तान्हा बाळ याना एकाकी टाकून तूं घटस्फोट घेऊन घनःशामांबरोबर गेलीस. तुझा घटस्फोटाचा अर्ज व्यंक-टरावांना वज्राघातासारखा वाटला. त्यांनीं कांहीं विरोध न करतां तुला घटस्फोट घेऊं दिला.

'आज तरी तूं पूर्ण समाधानी आहेस का?

'घनःश्याम तरी तुझ्या हृदयाचे स्वामी होऊं शकले का?

'मलबार हिलवरील त्याच्या धनाढ्य मित्रांवरही तुझी दृष्टि जातेच. घनःशामाशीं तरी तूं किती दिवस इमानानें राहाणार?

' तुला उनाड स्त्री कां म्हणूं नये ?

' पतीचें सोडा पण तूं आपल्या तान्हुल्याला कशी विसरलीस ? त्या निष्पाप जीवानं असं काय पाप केलं होतं ? '

मोहिनीला ही अदृश्यवाणी ऐकवेना. हा भास तिला खरोखरीचाच वाटला.

ती स्वयंस्फूर्तीनेंच उद्गारली, ' नाहीं नाहीं. माझ्या बाळाला मी टाकणार नाहीं. माझा बाळ–माझा बाळ ! माझा दिलीप ! '

तिनें कावऱ्याबावऱ्या इकडे तिकडे पाहिलें—

समोरच्या आरशांतील प्रतिबिंब तिच्याकडे पाहात होतें. तिला स्वत:चाच राग आला.

मोहिनी बावरून गेली.

' खरंच माझा बाळ कुठं ?' मोहिनी स्वत:लाच विचारूं लागली.

तिच्या हृदयाला शतशः वेदना होऊं लागल्या. तिचीं स्तनाग्रे उत्तेजित झालीं. बाळाला हृदयाशीं धरून पाजावा असें तिला तीव्रतेनें वाटूं लागलें. तिच्या स्तनांतून दूध वाहूं लागलें.

तिनें अगतिक होऊन टेबलावर डोकें टेकलें.

आणि त्या रात्रींच्या काठेवाड एक्सप्रेसनें बडोद्याला जातांना तिच्या डोक्यांत बाळासंबंधींचेच विचार घोळत होते–बाळ कसा असेल, तो काय करीत असेल-तो आपल्याला ओळखील का ?–ओळखणार कुठून ? त्याला सोडून आपण आलें तेव्हा अवघा वर्षाचा असेल नसेल आणि त्याला आईची ओळख दिली तरी तो आपल्याकडे येईलच कशावरून ? व्यंकटरावांनीं त्याला आईचा तिरस्कार करायला शिकविलें असलें तर ? कसा ओढा लागावा बाळाला ?

' माझं बाळ तें ! ' असें म्हणून बाळासाठीं घेतलेल्या कचकड्याच्या बाहुलीला तिनें आपल्या उराशीं कवटाळलें. जणुं सारें सांठवलेलें वात्सल्य ती त्या बाहुलीवर वर्षाव करीत होती.

गाडीच्या हेलकाव्याबरोबर तिचें मनही हेलकावे खात होतें.

रात्रीं एकदां ती जागी झाली, तेव्हां घन:श्यामाचा विचार तिच्या डोक्यांत आला.

बडोद्याला जाण्याची तयारी केली तेव्हां त्यांनीं विचारलें होतें:

' कुठें निघालीस ? '

' बडोद्याला ! '

' कां ? '

' मैत्रिणीला भेटायची इच्छा झालीय् ! '

' ही कोण बुवा मैत्रीण ? '

' तुम्हाला काय करायचंय् त्याच्याशीं ? '

' आज नाहीं गेलं तर चालणार नाहीं का ? '

' नाहीं. आजच जाणं अवश्य आहे मला ! '

त्यावर घन:श्याम कांहीं बोलले नाहींत. त्यांना तिचें जाणें आवडलें नाहीं असें दिसलें. पण तिचा करारी स्वभाव त्यांच्या परिचयाचा असल्यामुळें त्यांनीं तिच्या मर्जीप्रमाणें घेतलें.

नोटांचें पुडकें तिच्याकडे देत ते म्हणाले, ' संभाळून जा ! '

आणि त्यांच्या या वागणुकीचें स्वागत तिनें एक तिरस्काराचा कटाक्ष फेंकून केलें होतें.

गाडींत या प्रसंगाची तिला स्मृति झाली तेव्हां हाच तिरस्कार तिच्या चेहऱ्यावर उमटला.

सकाळीं बडोदें स्टेशनवर गाडींतून उतरतांना मोहिनीनें उत्सुकतेनें आजूबाजूला पाहिलें. आपणाला कोणी ओळखतें कीं काय अशी शंकायुक्त भीतीच या उत्सुकतेच्या बुडाशीं होती. आणि स्टेशनच्या बाहेर पडेपर्यंत कित्येक ओळखीचे चेहरे तिच्या नजरेला पडले, तेव्हां ती अधोवदन करीत चालूं लागली.

मोटरनेंच ती शहरांत जाण्यास निघाली.

सर्व रस्ते आणि वाटेंत दिसणाऱ्या कित्येक व्यक्ति तिच्या परिचयाच्या होत्या. त्याच बडोदें शहरावर ती एके काळीं अत्यंत फिदा होती. बडोदें शहरांतील ते रुंद रुंद आणि स्वच्छ रस्ते, आधुनिक पद्धतीवर बांधलेलीं सुंदर घरें पाहून तिला त्याचा एक प्रकारें अभिमान वाटत होता. त्यांच्या पुनर्दर्शनानें तिचा चेहरा खुलला.

दांडिया बाजाराजवळ मोटर आली तेव्हां तिची दृष्टि नेहमींप्रमाणें समोरच्या टॉवरवरील घड्याळाकडे वळली. तिला सर्व वस्तू विचारीत होत्या, ' मोहिनी तूं आम्हांला सोडून कुठें गेली होतीस ? '

तिच्या छातींत दुरुदुरु व्हायला लागलें. समोर एक सुंदर निळा बंगला दिसत होता. तिच्या मनांत कांहीं विचार येतात न येतात तोंच बंगल्याच्या बाहेर कोरलेलीं ' मोहिनी–निवास ' हीं अक्षरें अजूनही तेथें असलेलीं तिच्या दृष्टीला पडलीं; आणि तिला कसेसेंच झालें.

मोटरवाल्याच्या हातावर चार नाणीं ठेवून ती मोटरमधून उतरली.

या वेळीं मात्र तिनें मोटरचें दार कसें अलगद हळुवार हातानें लावून घेतलें.

आपली छोटीशी बॅग हातीं घेऊन ती बंगल्याच्या आवारांत शिरली.

तिला समोर येतांना पाहून दरवाजावर बसून चिलीम ओढण्यासाठीं तोंडाजवळ गेलेले रामदिन भय्याचे हात तसेच जागच्या जागीं राहिले. आश्चर्याच्या भरांत त्याची चिलीम गळून पडली.

तो आ वासून तिच्याकडे पहात उभा राहिला.

त्याच्याकडे दृष्टिक्षेप न करतां मोहिनी तडक आंत शिरली.

तेथील सर्व वस्तु तिच्या परिचयाच्या होत्या, पण त्या तिला परक्या वाटूं लागल्या. आंत शिरतांना तिला विलक्षण संकोच वाटूं लागला.

आणि दिवाणखान्यांत येतांच ती किंचित् थबकून उभी राहिली.

जवळच लागून असलेल्या व्यंकटरावांच्या खोलींतून तिला बोलणें ऐकूं येत होतें:

' दिलीप ? राजा–उठायचं ना आतां ! उठा उठा ! किती झोंपायचं ! '

आणि त्यानंतर कोणाची तरी मधुर हालचाल मोहिनीच्या कानीं पडली. झाडलेला आळस आणि त्या वेळीं काढलेला विशिष्ट हुंकार तिला ओळखीचा वाटला.

पुनः आवाज आला.

'उठलास ? चला. आतां तोंड धुवायूचं, काऊ खायचा नि भूर जायूचं !'

'कुठं जायूचं ?'

मोहिनीनें ओळखलें कीं, हा स्वर आपल्या बाळाचाच आहे.

त्या आवाजानें तिच्या अंगावर सुखकारक रोमांच उठले.

'खूप लांब जायूचं. राजवाडा पहायला जायूचं !' हें उत्तर व्यंकटरावांचें आहे हें मोहिनीनें ओळखलें.

'नको मला लाजवाडा. आपण मुंबईला जाऊं आईला आणायला. आई कदीं येनाल, शांगा ?' त्यानें लडिवाळपणें विचारलें.

मोहिनीच्या सर्वांगाला मुंग्या आल्या.

ती हुंदके देऊं लागली.

क्षणभर स्तब्धता होती.

मोहिनीच्या कानावर त्यांचें अस्पष्ट बोलणें पुनः येऊं लागलें. व्यंकटराव इतक्या सहजपणें त्याला खेळवीत होते, कीं त्यामुळें मोहिनीला वाटलें, आईची उणीव व्यंकटरावांनीं भरून काढली आहे.

आणि या कल्पनेनें तिच्या हृदयांत मत्सराचें शल्य टोचूं लागलें.

कांहीं वेळ तिनें मनाचा निश्चय केला आणि ती व्यंकटरावांच्या खोलींत शिरली.

तिनें आपल्या हातांतील बॅग आणि बाहुली खालीं ठेविली आणि गतपति आणि मुलगा यांच्याकडे पाहिलें.

व्यंकटराव तिच्याकडे आश्चर्यानें पहात होते. हळू हळू त्यांच्या आश्चर्याची जागा तिरस्कारानें घेतली.

दिलीप दोघांच्याही चेहऱ्याडे भांबावलेल्या नजरेनें पहात होता.

त्यानें व्यंकटरावांना विचारलें, 'ही मादी आई ?'

मोहिनीला राहवलें नाहीं. तिनें चटकन् त्याला उचलून घेतलें आणि तिनेंच उत्तर दिलें, 'होय बरं बाळ !'

तिनें त्याला हृदयाशीं धरलें. त्याचीं अनेकवार चुंबनें घेतलीं.

व्यंकटराव तेथून केव्हांच निघून गेले होते.

त्यानंतर बाळ आणि आई किती तरी वेळ बोलत राहिलीं होतीं. त्या चार दिवसांत व्यंकटरावांना असें आढळून आलें कीं, दिलीप आपल्या आईकडे जास्त लोभावला आहे. जी उणीव आजवर त्याच्या जीवनांत भासत होती ती भरून निघाली आहे; त्या दिवसापासून दिलीप आपल्या-पेक्षां मोहिनीच्याच सहवासांत जास्त रमत आहे.

त्यांना वाटलें, बाळ आपल्यापासून दुरावत आहे. ती कल्पना त्यांच्या हृदयाला सहन झाली नाहीं. त्यांना आपण एकटे पडलों याची जाणीव होऊं लागली.

लोकांत टीका होऊं लागली तेव्हां ते सांगूं लागले, आई आणि मूल यांच्यांत ताटातूट करणारा मी कोण ? ती आतां माझी पत्नी नसली तरी बाळाची आई तर खास आहे. तें नातें मला तोडतां येणार नाहीं.

नंतर तर ते असेंही म्हणूं लागले, दिलीपला येऊन भेटायला तिला कोणतीच हरकत नाहीं.

मोहिनी गांवांत आपल्या एका मैत्रिणीकडे राहिली होती.

ती रोज बाळाला येऊन भेटत असे. पुष्कळ वेळां बाळ तिच्या-बरोबर जाण्याचा हट्ट घेई. ती आली म्हणजे व्यंकटरावही तिच्याबरोबर गप्पा मारण्यांत काळ घालवूं लागले.

ते आतां असेंही म्हणूं लागले, आम्ही आतां पतिपत्नी राहिलों नसलों तरी मित्र आणि मैत्रिणी तरी खास आहोंत. मित्रत्वाच्या नात्यानें वागायला आम्हांला कोणतीच हरकत नाहीं.

मोहिनीचा मुक्काम यापुढें मात्र वाढत चालला. तिला येऊन पंधरावीस दिवस झाले होते.

व्यंकटरावांच्या दिवाणखान्यांतील झोंपाळ्यावर दिलीपला मांडीवर घेऊन झोंके घेत असतां ती एक पत्र वाचण्यांत गढून गेली होती.

मुंबईहून घन:श्यामांनीं तिला पत्र पाठविलें होतें. त्यांनीं लिहिलें होतें:

'माझ्यापासून घटस्फोट घ्यायचा असेल तर खुशाल घे. मी तुला आडकाठी करीत नाहीं. तुझ्याबरोबर लग्न केलं हाच गुन्हा झाला. तुझं आजवरचं उनाड वर्तनच सांगत होतं, कीं तूं असं कांहींतरी करशील म्हणून. तेव्हां मला आश्चर्य वाटत नाहीं. बोलूनचालून उनाड स्त्री तूं–'

—घन:श्याम

मोहिनीनें स्मित केलें. तिनें पत्राची घडी करून ठेवून बाळाचा एक पापा घेतला आणि ती जोरानें झोंके देत बाळाला गाणें म्हणूं लागली.

या वेळीं आपल्या खोलींत बसून व्यंकटराव आपल्या डायरींत लिहीत होते:

'कसं झालं तरी माझ्या बाळाची आई आहे ती! नि शिवाय...'

---

# बालदृष्टि : ३

शहरांतल्या शाळेंत येऊन बंडूला चारच दिवस झाले होते. नवी आणि त्यांतून शहरांतली शाळा असल्यामुळें तो अगत्यपूर्वक लवकर शाळेला जात असे. मात्र तें नेहमीं त्याला जुळेच असें नाहीं.

आजही तो अगदीं सकाळींच बाहेर पडला. अर्धी विजार, अंगांत नुसता शर्ट आणि डोकीला टोपी असा त्याचा साधा पोषाख होता. आतां इंग्रजी शाळेंत जाऊं लागल्यामुळें पूर्वीप्रमाणें त्याच्या पाठीशीं पाटीदप्तर दिसत नव्हतें. त्यानें आपलीं पुस्तकें चामड्याच्या पट्ट्यांत बांधून घेतलीं होतीं.

पुस्तकांचा गठ्ठा एका हातानें छातीशीं धरून तो हळुहळू रस्ता चालत होता.

त्याच्या मामाचें घर शाळेपासून दूर असल्यामुळें बंडूला रोजचा असा प्रवास करावा लागत होता.

पण हा प्रवास त्याला कधीं कंटाळवाणा गेला नाहीं. त्याच्या खेड्यांतल्याप्रमाणें तेथें नदी नव्हती, आंबराई नव्हती किंवा माडांची लांबच लांब बागही नव्हती. तरी त्याच्या मनाला आकर्षित करूं शकणाऱ्या गोष्टी तेथेंही वाटेंत पुष्कळ दिसत होत्या.

वाटेंत त्याला खेड्यांत सहसा कधीं न दिसणारीं सुंदर सुंदर घरें दिसत होतीं. त्या घरांच्या अवतींभवतीं छान छान बागा दिसत होत्या. रस्ते कसे स्वच्छ आणि मोठाले होते. वाटेंत झाडें होतीं. पण तीं अगदींच

तुरळक. मात्र सांवरीचें उंचच उंच झाड वाटेंत लागे तें घटकाभर उभें राहून पहाण्याचा मोह त्याच्या मनाला झाल्याखेरीज राहात नसे. सांवरीच्या झाडाचा कापूस झाडावरून पडतांना पाहाणें यासारखी दुसरी गंमत असेल असें बंडूला तरी त्यावेळीं वाटत नसे. आणि त्या कापसांतील एखादा तंतु घेऊन त्यावर फुंकर घालीत तो जेव्हां जाई तेव्हां शाळा केव्हांच आली असें त्याला वाटे. मात्र केव्हां केव्हा वाटेंत त्याचा असा खेळ चालला असतां एखाद्या सुंदरशा घराच्या दारांत उभा राहून जेव्हां एकादा कुत्रा भुंके तेव्हां सांवरीच्या कापसावरून त्याचें लक्ष त्या कुत्र्याकडे जाई. त्यानें कधीं कुत्रें पाहिलें नव्हतें असें नाहीं; पण या घरांच्या दारांतील कुत्रे त्याला निराळेच वाटत. ते खेड्यांतील कुत्र्यांप्रमाणें दिसायला ओंगळ नव्हते. उलट त्यांना जवळ घेऊन खेळवावें असा बंडूच्या मनांत विचार येई. पहिल्या पहिल्यानें तो त्यांना घाबरत असे पण त्यांच्या गळ्यांत भली मोठी सांखळी बांधलेली असते हें पाहून त्याची भीति कमी होऊन तो हळुहळू त्यांच्या जवळही जाऊं लागला होता.

आणि तो भीत नाहीं असें पाहून ते कुत्रेही आपलें सौम्य स्वरूपच कायम ठेवीत. त्या कुत्र्यांकडे घटकाभर पहात बसावें हा बंडूच्या रोजच्या कार्यक्रमांतील एक कार्यक्रम होऊन बसला.

वाटेंतील त्याच्या या नादांमुळें त्याला शाळेंत जायला उशीर होत असे हें काय सांगायला हवें?

त्याच्या हेडमास्तरनीं त्याला पहिल्याच दिवशीं सांगितलें होतें, ‘ बाळ, असा उशीर करायचा नाहीं हं? वेळीं हजर राहिलं पाहिजे शाळेंत. ’

त्यावर बंडूनेंही त्यांना धिटाईनें उत्तर दिलें होतें: ‘ हो मास्तर, उद्यां मी वेळीं येईन. पण घंटा कुठं असते मास्तर? मी नाहीं ऐकिली कुठं ती?’

इतर मुलें हंसूं लागलीं. मास्तरही हंसूं लागले. ते कां हंसतात हें बंडूला कळलें नाहीं. पण त्यांच्याबरोबर तोही हंसूं लागला.

‘ मला घंटा कुठं आहे ती दाखवा ना मास्तर!’ त्यानें जेव्हां

असा हट्ट धरला तेव्हां मास्तरनीं बाहेर नेऊन उंचावर टांगलेली घंटा त्याला दाखविली.

त्यावेळीं त्यानें जी प्रश्नांची सरबत्ती केली त्यावरून मास्तरांना कळून चुकलें कीं हें प्रकरण कांहीं निराळेंच आहे. घंटा मास्तर वाजवित नाहींत, शिपायी वाजवितो हें कळून आल्यामुळें त्याला बरें वाटलें नाहीं. मास्तरांच्या खोलीशेजारीं घंटा असतांना ते शिपायाला कां वाजवूं देतात असाही प्रश्न त्यानें मास्तरांना केला आणि आपल्याला तो मान मिळेल कीं नाहीं याबद्दलही चौकशी केली. पण घंटेला त्याचा हात पोंचणार नाहीं हें जेव्हां मास्तरनीं त्याला पटवून दिलें तेव्हां त्याची समजूत पटली.

पण लगेच त्यानें विचारलें, ‘ मास्तर, हेडमास्तर कुठं असतात ? ’

‘ कां रे ? तुला काय करायचं त्यांच्याशीं ? ’ मास्तरनीं हंसून विचारलें.

‘ कांहीं नाहीं बा ! मी पहाणार आहे त्यांना ? ’ त्यानें सरळ उत्तर दिलें.

‘ मीच हेडमास्तर ! ’ मास्तरनीं उत्तर दिलें.

‘ छे ! तुम्ही नाहींच. तुम्ही पगडी कुठें घालतां ? ’

आणि त्यानें कबूल केलें नाहींच ते हेडमास्तर म्हणून. हेडमास्तरना त्या घटकेपासूनच त्याचा लोभ जडला.

आणि दुसरे दिवशींही तो पुनः जेव्हां उशीरां आला तेव्हां त्यांनीं त्याला विचारलें.

त्यावेळीं त्यानें आपल्या वाटेंतील प्रवासाची माहिती मास्तरना करून दिली आणि तसला एक कुत्रा आपणाला द्याल का म्हणूनही मागणी केली.

आणि असें रोज चाललें होतें.

आज बंडू चालला होता. पण त्याचें लक्ष वाटेंतील गमती बघण्याकडे फारसें नव्हतें. कुत्र्यानें नेहमीप्रमाणें भुंकून त्याला सलामी दिली. पण त्यानें तिकडे पाहिलेंच नाहीं.

त्याला आज घराकडील आठवण होत होती. सांवरीच्या झाडावर

बसलेल्या कोकिळेचा स्वर त्याच्या कानावर पडल्यामुळें त्याची वृत्ति चलबिचल झाली होती. एकाएकीं त्याला आपल्या घरासमोरील पिंपळाच्या झाडावर बसून गाणाऱ्या कोकिळेची आठवण झाली.

ती कोकिळा बंडूची जणु मैत्रीणच होती. सकाळीं डोळे चोळीत चोळीत जेव्हां बंडू घराबाहेर येत असे त्यावेळीं त्याच्या कानावर तिच्या गाण्याचे स्वर पडत असत.

'कुहू ऽ ऽ कुहू ऽ ऽ'

आणि मग लगेच बंडूही तिला उत्तर देत असे.

'कुहू ऽ ऽ कुहू ऽ ऽ'

त्याच्या उत्तरानें कोकिळा चिडत असे आणि ती जोराजोरानें कुहू कुहू करी. मग बंडूही तिला पुन: पुन: चिडवी. त्याचा हा खेळ बराच वेळ चाले आणि शेवटीं कंटाळून कोकिळा उडून दूर जाई. बंडू चहा प्यायला जाई.

नेमकी याचीच आठवण बंडूला आज विशेष झाली. आणि त्याचें मन घराकडे लागलें. यामुळेंच वाटेंत त्याचे इतर ठिकाणीं लक्ष लागेना.

त्यानें आपलीं बोटें तोंडांत घालून शिटी वाजविली. दोन्ही हाताचीं बोटें एकमेकांत गुंतवून शंख केला आणि एवढ्या जोरानें फुंक मारली कीं त्या आवाजानें पलिकडच्या डोंगरावरून घुमत घुमत प्रतिध्वनि आला.

बंडूला त्याची मौज वाटली.

त्यानें पुन: पुन: आवाज काढला.

आणि त्याचा पुन: पुन: प्रतिध्वनि झाला.

मात्र या नादात तो आपला नेहमींचा मार्ग चुकून भलत्याच मार्गानें जाऊं लागला.

आपल्या तंद्रींतून जागा होऊन त्यानें पाहिलें–तेव्हां एका बागेजवळ आपण येऊन पोंचलों आहोंत असें त्याला आढळून आलें.

आणि त्या बागेंतील आंब्याच्या भारानें लवलेल्या फांद्या पाहून त्याचें मन आनंदानें भरून आलें.

कसे घोंसदार आंबे दिसत होते. सूर्याचीं किरणें त्या आंब्यांवर पडून त्यांच्यांवरील लाली अधिकच चमकत होती.

बंडूला आपल्या घराकडील आठवण झाली.

त्याच्या गांवीं घराशेजारींही असेच आंबे भराला आले होते. दरवर्षी तो आपल्या सोबत्यांसह आंबे पाडून खात असे.

यावर्षी तेथें आपण नसल्यामुळें तें सौख्य आपल्याला मिळणार नाहीं याचे त्याला वाईट वाटलें. पण तें क्षणभरच. समोर प्रत्यक्ष आंबे दिसत असतां त्याची आनंदीवृत्ति उचंबळून आल्याखेरीज कशी राहील ?

त्याचें मन आनंदानें नाचूं लागलें.

आणि त्या आनंदाच्या भरात त्यानें आपलीं पुस्तकें खालीं ठेविलीं. आणि एक दगड घेऊन एका आंब्यावर नेम धरून दगड फेकला.

आंबा टप्कन खालीं पडला.

बंडूचा आनंद गगनांत मावेना. तो आंबा उचलून घेण्यासाठीं खालीं वांकला.

'अरे चोरा बरा सांपडलास !'

बंडूनें मागें वळून पाहिलें:

एक गृहस्थ मागें उभे राहून आपल्याकडे पाहून म्हणत आहेत.

त्यानें आंबा उचलून घेतला आणि त्यांच्याकडे पाहिलें.

त्या गृहस्थाची रागीट मुद्रा पाहून त्याला थोडी भीतीही वाटली.

'रोज हाच उद्योग चालतो, नाहीं ?' बंडूच्या दंडाला धरून त्यांनीं विचारलें.

त्यानें आपला हात सोडवून घेण्याचा प्रयत्न केला पण तो जुळला नाहीं.

'माझा हात सोडा. मला जाऊं द्या. मला शाळेंत जायला उशीर होईल. मी मास्तरना सांगीन हं तुमचं नांव.'

'चोर तो चोर न् वर शिरजोर. आंबे चोरायला हवेत नाहीं ? थांब हं, तुला आंबेच देतों !' असें म्हणून त्यांनीं बंडूच्या गालावर जोराची चापट मारली.

बंडू चिडला.

' कुणाला चोर म्हणतां? मला कां मारलं?'

' तुला, तुला. चोरी करणाराला असाच मार मिळतो बरं. माझ्या आंब्यांना हात लावायला तुला कुणीं सांगितलं होतं? '

बंडूच्या रागानें आतां आश्चर्यांत प्रवेश केला होता. त्याला त्याच्या बोलण्याचा अर्थच समजत नव्हता.

झाडावरचा आंबा दगडानें पाडणें ही चोरी कशी होते हेंच त्याला कळेना आणि चोरी म्हणजे काय हें तरी त्याला कुठें नीटसें समजत होतें?

आंबा पाडल्याबद्दल आपणाला मार का मिळावा हे त्याला कांहीं केल्या समजेना.

त्यामुळें तो बावरून गेला.

त्याला परमावधीचें आश्चर्य वाटत होतें–मला त्यानीं उगाच कां मारावं?

' चल, नीघ इथून, पुन: सांपडलास तर तंगड्याच मोडून ठेवीन ' त्या गृहस्थानीं त्याला दम दिला.

बंडू मुकाट्यानें वाट चालूं लागला. तो मागें परतला आणि नेहमींच्या मार्गानें शाळेंत जाऊं लागला.

पण त्याला एकच कोडें पडलें होतें–आपणाला उगाच मार कां मिळावा? झाडावरचा आंबा पाडल्यानें चोरी कशी होते? आणि चोरी म्हणजे काय?

त्याला आठवत होतें–आपल्याही घरीं आंब्याचीं झाडें आहेत. त्या झाडांवर खूप आंबे येतात; ते आंबे आपण दगड मारून पाडतों, शेजारचीं मुलेंही पाडतात–पण त्याबद्दल आपणाला कोणी मारलेलें नाहीं, बोललेलें नाहीं. शेजारच्या मुलांनाही आपले बाबा कधीं रागें भरलेले नाहींत त्याबद्दल—

मग त्या बागेंतील आंबा आपण पाडला, यांत काय वाईट झालें?

या प्रश्नाचें उत्तर कांहीं त्याला देतां येत नव्हतें. आणि

अखेरीला त्याची खात्रीच होऊन चुकली कीं आपणाला कांहीं कारण नसतां मार मिळाला.

तेव्हां त्याच्या चिमण्या टपोर डोळ्यांतून पाणी वाहूं लागलें.

त्याचा चेहरा घामाघूम झाला. त्याचें तोंड आंब्यासारखें लाल झालं. रडत रडत तो शाळेजवळ आला.

त्यानें पाहिलें -- मास्तर झाडांना पाणी घालीत आहेत. तो तेथेंच रेंगाळत उभा राहिला.

अजून शाळा सुरू व्हायला अवकाश होता. मुलें गोंगाट करीत खेळत होतीं.

शाळेचे हेडमास्तर भाऊसाहेब झारीनें झाडांना पाणी घालीत होते. त्यांच्यासमोर मुलें खेळत होतीं, गोंगाट करीत होतीं. पण त्याचा त्यांच्या मनाला त्रास होत नव्हता. उलट त्यांच्या खोड्या त्यांच्या मनाला आल्हाद देत होत्या.

ते फुलझाडांना पाणी घालीत होते. पण त्यांच्या डोक्यांत या वेळीं मुलांबद्दल विचार चालले होते. ते मनांत म्हणत होते —या फुलाची जोपासना जितक्या आपुलकीने मी करीत आहे तितकीच गेलीं पांच वर्षें या मुलाची करीत आहे, नाहीं का? नोकरीची अपेक्षा न धरतां जन्म-भूमीची सेवा करता यावी म्हणून गावात शाळा काढली. पांच वर्षें झालीं या गोष्टीला या अवधींत कल्पनेप्रमाणें यशही येत गेलें. आज घरोघर शिक्षणाचे ध्वनि ऐकूं येत आहेत या गांवांत-हीं फुलें माझ्या अंतःकरणाला सुखवितात त्याहूनही अधिक मुलें सुखवितात. दोघाच्याही सहवासात माझा दिवस जातो. आजचीं फुले उद्यां सुकून जातील; पण आजचीं मुलें उद्या अधिकाधिक विकसत जातील. त्याचे जीवन या फुलासारखें सुगंधित करण्याचें भाग्य माझ्या हातीं आलें आहे.

या विचाराने भाऊसाहेबांच्या अंगावर सुखकारक रोमांच उभे राहिले. त्यांनीं आवेगानें मोगरीच्या वेलीवरील एका कळीचें चुंबन घेतलें.

बंडू दुरून पहात होता. त्याला हेडमास्तरांच्या कृतीचें आश्चर्य वाटलें तसा आनंदही वाटला. तो हळू हळू त्यांच्याजवळ येऊन दाखल झाला.

त्याला पाहून भाऊसाहेबांनीं विचारलें, ‘ कायरे बंडू ? अं ? रडत-बिडत होतास वाटतं ? ’

बंडूच्या गालावर आंसवें अजूनही चमकत होतीं.

भाऊसाहेबांच्या प्रश्नानें बंडूला आंबा चोरीची आठवण होऊन तो स्फुंदूं लागला.

‘ काय झालं बंडू रडायला ? ’ भाऊसाहेबांनीं त्याच्या पाठीवरून हात फिरवित विचारलें.

बंडूनें त्यांना सर्व हकीकत सांगितली आणि मोठ्या केविलवाण्या स्वरानें विचारलें, ‘ मास्तर, मी चोरी केली का हो ? नाहींना ? मग मला कशाला मारलं त्यांनीं ? तुम्हीं तरी विचारा चला त्यांना ? ’

‘ बंडू, दुसऱ्याच्या बागेंतले आंबे पाडूं नयेत. दुसऱ्याची वस्तू त्याच्या नकळत घेतली कीं चोरी होते.’

मात्र त्यांच्या उत्तरानें बंडूचें समाधान कांहीं झालें नाहीं. तो मनांत म्हणत होता–आमच्या आंब्याचे आंबे पाडले तर चोरी होत नाहीं मग हीच कशी चोरी होईल ?

त्यानें भाऊसाहेबाना विचारलें; ‘ मास्तर चोरी म्हणजे काय हो ? ’

भाऊसाहेबांना गहिंवरून आलें. त्याला जवळ घेऊन थोपटीत ते कांहींसे पुटपुटले. चोरी म्हणजे काय याची ज्याला स्पष्टशी कल्पना नाहीं त्या निष्पाप मुलाला ते काय उत्तर देणार ? त्याचें कसें समाधान करूं शकणार ?

‘ बंडू, तुला कसं पटवून देऊं मी ? तुझ्या नि जगाच्या दृष्टींत केवढा फरक आहे ! मुलांची दृष्टी आकाशासारखी व्यापक असते तर मोठ्यांची विहिरीहूनही आकुंचित. तुझ्या दृष्टीला ही चोरी दिसत नाहीं पण—’ मास्तर स्वतःशींच पण बंडूला उद्देशून पुटपुटले.

त्यांनीं बंडूला जवळ घेतलें आणि ते त्याला वर्गात घेऊन जाऊं लागले.

भाऊसाहेब मनांत म्हणत होते–या मुलाच्या साध्या प्रश्नाचें मला उत्तर देतां येत नाहीं. मग मी याचें जीवितपुष्प सुगंधित कसें करूं शकणार ?

बंडूला सारखें वाटत होतें कीं आपल्या बाबतींत मोठा अन्याय झाला आहे. आपल्यावरील अन्यायाची दाद, ज्यांच्यावर आपला अत्यंत विश्वास ते मास्तरही लावू शकत नाहींत.

त्याच्या मनाला कोडें पडलें होतें— मग कुणी याचं उत्तर देईल ?

त्याच्या डोळयांसमोर गावीं असलेल्या त्याच्या आईची मूर्ति उभी राहिली.

त्याला विलक्षण आनंद वाटला. आईच आपल्या प्रश्नाचें उत्तर देईल असें त्याला विश्वासपूर्वक वाटलें.

घरीं गेल्यावर त्यानें आईला पत्र लिहिलें. त्यात त्यानें लिहिलें होतें:

‘ आई ग,...............

.......................

...मग मी चोरी केली का ग ?
आई झाडावरचा आंबा पाडला
कीं चोरी होते ?
.. आई, चोरी म्हणजे काय
ग ?.. ............... ’

पत्राच्या शेवटीं शेवटीं अक्षरें अगदीं पुसट पुसट झालीं होतीं.

तीं आईच्या आंसवांनीं पुसट झालीं होतीं कीं बाळाच्या आसवांनीं, हें बंडूच्या चोरीच्या कोड्याप्रमाणें कोडेंच आहे एक !

---

# कॉ. सारंग : ४

तें दृश्य पाहून माझ्या अंगावर शहारे आले. एक भिकारी आणि त्याच्याबरोबर चार पांच कच्च्या बच्च्यांचें लेंढार. नुकतेच आम्ही दोघे शिवडीच्या कामगार मैदानावर कामगारांपुढे व्याख्यान देऊन आलों होतों. अलिकडे माझा मित्र कॉ. सारंग याच्या नादीं लागून मीही थोडाफार सभेंत बोलूं लागलों होतों. गिरणींत काम करणाऱ्या कामगार स्त्रियांची दु:सह स्थिति यावर मी व्याख्यान झोडून आलों होतों. कामगारांच्या मुलांची किती शोचनीय स्थिति असते याचें मी काव्यमय वर्णन करून कामगारांकडून टाळ्यांच्या रूपानें सहानुभूति मिळविली होती आणि आतां तेंच दृश्य माझ्या समोर दिसताच माझ्या अंगावर शहारे आले !

भिकारी दीनवदन करून गाडींतील लोकाकडे याचना करीत होता.

तो आमच्या अगदीं जवळ आला.

"काय ही आमच्या देशाची स्थिति ! खायला मिळायाची मारामार नि पोरांचं लेंढार ! या पेक्षां–" मी माझें बोलणें अर्धवट सोडून दिलें. कारण तो आतां आमच्या अगदीं जवळ येऊन याचना करीत होता.

त्याचा तो फाटका आणि मलिन वेष, त्याच्या अंगाला चिकटून राहिलेलीं तीं काळींविद्रीं उघडीं नागडीं तीनचार पोरें यांची मला शिसारी आली आणि या सर्वांवर कळस करण्याकरितांच कीं काय त्याच्या खांद्यावर एक तान्हें पोर पडून राहिलें होतें. त्याला पाहून मुलांच्या प्रयोग शाळेंतील भिंतीवर टांगलेल्या अस्थिपंजराच्या चित्राची मला आठवण झाली.

भिकारी आम्हांला म्हणाला, " दादा, एकच पैसा. या पोराकडे पहा, त्याची दया करा ! "

मी एक तिरस्काराची दृष्टि त्याच्याकडे फेंकून म्हटलें, " असलं ध्यान जिवंत ठेवण्यापेक्षां त्याला अफूची गोळी कां देत नाहींस ? "

माझे शब्द त्या भिकाऱ्याच्या ममोवर लागलेले दिसले. त्याच्या काळ्यासावळ्या मुखावर हिरवी छटा दिसली. माझ्याकडे डोळ्यांतील एक तांबडा कटाक्ष फेंकून त्यानें आपल्या खांद्यावरील मुलाच्या पाठीवरून आपला हात फिरविला आणि त्याच्या गालाचें हळूच चुंबन घेतलें.

भिकारी निघून गेला होता.

सारंगभाई माझ्याकडे मिस्किलपणें पहात हंसत होता.

' दिवसेंदिवस तूं गांधीवादाकडून कम्युनिझम्‌कडे येत चाललायस्‌ याबद्दल तुझं मी अभिनंदन करतों ! ' सारंग माझ्या पाठीवर थाप मारीत म्हणाला.

' अरे कसला कम्युनिझम्‌ घेऊन बसलायस्‌ ! तुला ठाऊक नाहीं महात्माजी हेच खरे कम्युनिस्ट आहेत. '

' तें कसं काय ? तुझ्या या हिंसात्मक तत्त्वज्ञानाबद्दल गांधींना आनंद होईल नाहीं ? ' सारंगनें विचारलें.

' तुम्हां भाई लोकांना महात्माजीचं अंतरंग ओळखतां आलेलं नाहीं. अशा प्रकारची हिंसा हीसुद्धां अहिंसात्मकच ठरते. गांधींनीसुद्धां निरुपयोगी वासराला ठार केलं आहे ! ' मी उत्तर दिलें.

' कांहीं म्हण, तूं कम्युनिस्ट होत चाललायस्‌ हें खरं ! '

' मी कुठं नाहीं म्हणतोय्‌ ! खरा गांधीवादी हा कम्युनिस्टच असतो ! ' मी ठांसून सांगितलं.

' भिकाऱ्याला उपदेश करायला ठीक आहे. स्वतःवर पाळी आली तर तूं आपलं मूल मारून टाकशील ? गायीचीं वासरं मारणं सोपं असतं, स्वतःचीं—'

' हें पहा, मला असले लपंडाव माहीत नाहींत. माझ्यावर पाळी आली तर भिकाऱ्याचा उपदेश मी स्वतः आचरणांत आणून

दाखवायलाही मागं पुढं पहाणार नाहीं !' माझ्या या उत्तरानें आणखी मिस्किलपणें तो हंसला.

मी त्याला उत्तर दिलें खरें. पण त्याच वेळीं माझ्या डोळ्यांसमोर माझ्या रजनीची बाळमूर्ति उभी राहिली.

माझ्या छातींत कळा आल्या सारखें झालें. माझा जीव अस्वस्थ झाला.

चर्निरोड स्टेशनवर गाडी येईपर्यंत आम्ही कुणी कुणाशीं चकार शब्द बोललों नाहीं.

जवळ जवळ शून्य मनानें त्याचा मी निरोप घेतला आणि घरीं परतलों.

घरीं येऊन ठेपतों तोंच दारांत उभ्या असलेल्या माझ्या पत्नीनें मला सांगितलें, 'रजनीला दुपारपासून ताप भरला आहे !'

माझ्या जिवाचा थरकांप उडाला.

मी रजनीच्या अंगाला हात लावून पाहिला. माझ्या हाताला जणुं चटका बसला.

मला घेरी आल्यासारखें झालें.

आणि त्या सहा महिन्यांत रजनीची प्रकृति ढांसळत गेली. तिच्याकडे पाहिलें म्हणजे मला त्या भिकाऱ्याच्या पोराची आठवण होई आणि माझ्या काळजाचें पाणी होई.

रजनीसाठीं माझी पत्नी आणि मी सारखीं रात्रंदिवस कष्ट करीत होतों. जागरणांनीं मी आजारी पडायला आलों होतों. भिकाऱ्याला मी जो उपदेश केला होता त्याचा मी सारखा विचार करीत होतों. पण जों हा विचार मनांत यावा तों रजनीविषयीं माझें हृदय वात्सल्यानें भरून येई. सहा महिन्यांपूर्वी माझी रजनी गुलाबाच्या फुलासारखी होती; तें फूल आतां सुकलें होतें तरीही त्याचा सुवास कायम होता. तिच्याबद्दलची माझी प्रीति तिळभरही कमी झाली नाहीं. उलट माझें हृदय अथांग प्रीतीनें वाहूं लागलें. एकांतांत माझ्या डोळ्यांत अश्रूंची गर्दी होई आणि माझें निरीश्वरवादी मन ईश्वराचा धांवा करूं लागे, "देवा माझ्या बाळीचें रक्षण कर !"

मला तो विचार कसासाच वाटला.

आणि त्यामुळें मी सारंगला भेटण्याचें टाळूं लागलों.

त्यानंतर लोकल गाडींत आमची सहज एकदां गांठ पडली. त्याला टाळतां येणें शक्यच नव्हतें मला. इकडल्या तिकडल्या गप्पा झाल्यावर त्याच्या आग्रहावरून मला त्याच्या घरीं जावेंच लागलें.

घरांत पाऊल ठेवतांच त्याच्या बायकोचा करुण हुंदका माझ्या कानीं पडला.

मला कांहींच कळेना.

आंघोळीसाठीं जातों म्हणून मला बसायला सांगून सारंग नळावर निघून गेला.

तेव्हां त्याच्या बायकोनें रडत रडत मला सर्व कहाणी सांगितली.

दोन महिन्यांपूर्वी त्याची बायको सातव्या महिन्यांतच बाळंतीण झाली होती. मूल वाचलें पण त्याची प्रकृति अगदीं अशक्त असल्यामुळें त्याची कसोशीनें काळजी घेणें अवश्य होतें. सारंग हा बोलून चालून कामगारभाई. त्याला आपल्या मुलाची भिजास राखणें शक्य नव्हते. याचा परिणाम व्हायचा तो झालाच. मूल नेहमीचें आजारी झालं. त्याची बायको आईच्या प्रेमानें खस्ता काढीत होती. सारंगाचें घरांत लक्ष नव्हतं तरीही मुलाच्या आजारीपणाचा त्याच्या कार्यक्रमांत अडथळा होऊं लागला.

एके दिवशीं तो आपल्या बायकोला म्हणाला.

‘ हे पहा, या पोराचा दोघांनाही उपद्रव होतोय्. याच्यासाठीं आतां खस्ता खाणं म्हणजे मेलेल्या म्हशीपासून दुधाची अपेक्षा करण्या-सारखं आहे. तूं तरी आतां किती त्रास काढणार आहेस ? ही अफूची गोळी देऊन टाक त्याला. सुटूं दे बिचारा त्या यातनांतून ! ’

सारंगाच्या या हृदयशून्य उपदेशानें त्याची बायको घाबरून गेली आणि त्या दिवसापासून ती आपल्या सोनुल्याला अधिकाधिक जपूं लागली.

पण अखेर सारंगानें तिचा दावा साधलाच.

त्या दिवशीं रासबेरी मिलमधील कामगार संप पुकारण्याबद्दल

सभा भरविणार होते आणि त्याचवेळीं त्याचें मूल अतिशय आजारी. न जावें तर असंख्य कामगारांच्या हिताचा प्रश्न तिकडे वाट पहात राहिलेला आणि जावें तर बायकोचे शिव्याशाप घ्यावे लागणार.

त्यानें आपल्या मनाशीं कांहीं एक निश्चय केला. मुलाला अफूची गोळी हळूच देऊन टाकली.

बायकोच्या मातृहृदयाला मोठा धक्का दिला.

तिची ही हकीकत ऐकून माझ्या हृदयांत कालवाकालव निर्माण झाली. सारंगाबद्दल आदर बाळगावा कीं त्याचा तिरस्कार करावा हेंच मला सुचेना.

तिच्या मातृहृदयाचा विचार करतां माझ्या आतड्याला पीळ पडत होता तर त्याच्या ध्येयवादाबद्दल आदराची भावना अस्पष्टपणें उत्पन्न होत होती.

आंघोळ करून आलेला सारंग टुवालानें अंग पुशीत होता. त्याच्या चेहऱ्यावर उदात्ततेखेरीज कोणताही विकार मला दिसला नाहीं- त्याच्या चेहऱ्यावर मार्दव आणि गंभीरता यांचे मिश्रण इतक्या बेमालू. मपणें झालें होतें कीं, त्याच्या अतरंगाचा टाव कुणालाच लागूं नये.

मी नकळत त्याच्याकडे आदराने पहात होतों.

इतक्यांत एक कामगार धावत धांवत तेथें येऊन दाखल झाला. तो सांगूं लागला, ' साहेब, रासबेरी मिलसमोर संपावर गेलेल्या कामगारांवर पोलिसांनीं लाठीहल्ला केला ! '

' चल मी आलोंच ! ' असं म्हणून सारंगानें भराभर कपडे करायला सुरवात केली आणि लगेच आम्ही दोघे बाहेर पडलों. बरेच दूर जायचें असल्यामुळें आम्ही एका व्हिक्टोरियांत जाऊन बसलों.

मला कळलेली हकीकत त्याला सांगून मी वाटेंतच विचारलें, " सारंग हें खरं का रे ? "

माझा प्रश्न ऐकतांच त्याचे विशाल डोळे पाण्यानें चमकले.

ओलसर पापण्या रुमालानें पुशीत तो उत्तरला, " भाई, मी स्वीकारलेला मार्ग अपरिहार्य होता. त्या भिकाऱ्याला तूंच ना तसा

उपदेश केला होतास ? मग माझ्या आचरणांत चूक कशी दिसते तुला ? बाकी या मार्गाचा अवलंब नेहमींच होणं हेंही वाईटच. म्हणून अशा अभागी आईबापांनीं जन्मच देऊं नये अशा मुलांना ! ”

आमची गाडी रासबेरीमिलच्या जवळ आली होती. सारंग आणखी कांहीं बोलणार होता, इतक्यांत गोळीबाराचे आवाज आमच्या कानावर येऊन आदळले.

त्यासरसा सारंग ताडकन् गाडीबाहेर उडी टाकून बाणासारखा त्या गर्दीकडे धांवत घुसला. त्यामुळें आमचें बोलणें अर्धवटच राहिलें.

मला त्या आगगाडींत भेटलेल्या भिकाऱ्याच्या अस्थिपंजर मुलाची आठवण यावेळीं झाली आणि माझ्या अंगावर त्या दृश्यानें शहारे आले !

---

# आधारस्तंभ ! : ५

नव्या घराचें काम सुरू झालें होतें. सामानाचे ढीगच्या ढीग तेथें येऊन पडूं लागले. एका मोठ्या ढिगाऱ्यांत लोखंडाचे मोठमोठाले खांब रचून ठेविले होते.

काळोख पडूं लागला तसे कामकरी हळूहळू आपापल्या घरीं जाऊं लागले.

सर्वत्र सामसूम झाल्यावर खांब आपआपसात बोलूं लागले—

" किती छान वारा सुटला आहे, अहाहा ! "

" अन् त्या पलिकडच्या बागेंतून किती घमघमाट सुटलाय् !"

" तो पाहिलास का चंद्र, कसा हळूहळू लपतछपत येतोय्. जणुं भुईचांफ्याचं फूलच ! "

" किती मजेदार चांदणं पडूं लागलं हें ! "

" अशा चादण्यांत हा बंगला किती किती सुरेख दिसेल ! "

" हे हालते डोलते वृक्ष, हा सुगंधाचा घमघमाट, अन् हंसरं चांदणं ! किती भाग्यवान् आम्ही या बंगल्यांत रहाणारे ! "

"......अशा बंगल्याचे आपण आधारस्तंभ "

" स् ! " एकजण मध्येंच ओरडला, " थांबा ! "

तो पहात असलेल्या दिशेकडे ते पाहूं लागले.

एक लहानशी करवत त्यांच्या शेजारीं बसून त्यांचें बोलणें ऐकत होती.

" कोण तें भिकारडं इथं आलंय् ! " सगळे एकदम ओरडले.

" कोणी परकं का आहे, भाऊ? तुमचीच एक बहीण!" एक लहानसा आवाज ऐकूं आला.

" हॅ! हॅ!! हॅ!!!—बहीण!"

" एकाच खाणींत आपण जन्मलों, भाऊ!"

ते पुनः एकदां उपहासाने हंसले.

एकमेकांच्या कानांत ते कांहीं तरी कुजबुजले.

आणि त्यांनीं तिला जोरानें दूर ढकलून दिली.

बिचारी करवत!

ओल्या मातींत जाऊन पडली.

त्या रात्रीं सारे खांब एकमेकांना चिकटून सुखानें झोंपी गेले. आणि ती मातींत तळमळत होती.

सकाळीं करवतीने पाहिले, सारे खांब आपल्याकडे पाहून उपहासानें हंसत आहेत.

हळू हळू कोवळीं किरणें पडूं लागलीं. करवतीला जरा हुशारी वाटली. ती मनांत म्हणाली, " किरणं माझ्यावरही पडत आहेत. काल रात्रीं चांदण्यानं मलाही न्हाऊं घातलं. फुलांचा सुगध घेऊन वाराही माझ्याकडे आला; पण हे माझे भाऊ—"

इतक्यांत कामकरी आले. त्यामुळें तिचे विचार दुसरीकडे वळले.

माणसें आपलीं कामें करण्यांत यंत्रासारखीं दंग झालीं. सुतार फूटपट्टीनें खांबांची लांबी मोजूं लागला. खांबांना आनंद झाला. त्यांची दृष्टि करवतीवर खिळून राहिली.

" जा रे, ती करवत घेऊन ये!" सुतारानें हुकूम केला.

खांब आश्चर्यानें करवतीकडे पाहूं लागले.

करवतीच्या मुखावर रात्रींची शीतलचंद्रिका उगवली होती.

सुतारानें एका खांबावर करवत ठेविली.

" भाऊ!" करवत म्हणाली, "आतां कसे मला दूर लोटाल?"

ते आधारस्तंभ आतां मुखस्तंभ झाले होते!

---

# भूक ! : ६

कैवल्यधामांतून मी बाहेर पडलों त्यावेळीं सकाळचे नुकतेच आठ वाजले होते. पिवळीं किरणें पडूं लागलीं होतीं. समुद्रावरून गार गार वारे येत होते. मी उल्हासितवृत्तीनें आजूबाजूचें निरीक्षण करीत हळू हळू पुलाच्या बाजूनें चालत होतों. सकाळींच फिरायला गेलेली मंडळी नुकतीच परतूं लागली होती. त्यांतील कित्येकांचे हास्यविनोद त्या शांत वातावरणांत वायुसारखे फिरत होते.

पावसाळा नुकताच संपला होता तरी पुलाखालील मोकळ्या जागेंत पावसाळी झुडपें हिरवीं गार दिसत होतीं. त्यांत उगवलेल्या हिरव्या पिवळ्या चिमुकल्या फुलांचा उग्र गंध वातावरणांत पसरला होता. पुलाला लागून असलेल्या भिंतीला रेल्वेलाईन जवळ-लागून असलेलीं दोन चार झोंपडीं पाहून मी कुतूहलानें उभा राहिलों. रानगवताच्या दरडींतील त्या इवल्याशा घरट्यात पाखरांऐवजीं माणसें राहात असलेलीं पाहून मला नवल वाटलें. त्याच्या दारात दोनतीन लहान मुलें खेळत होतीं; आणि समोर कांहीं पुरुष मंडळी गप्पा मारीत सकाळचीं उबदार किरणें अंगावर घेत बसलीं होतीं.

मी उभा राहून तें दृश्य पाहूं लागलों.

चार हातांच्या अंतरावर असलेल्या गगनचुंबी इमारतीशेजारीं असलेली ती झोंपडी पाहून मनाला विषाद वाटला. त्या इमारतींत कुत्र्या मांजरासाठीं खास खोल्या राखून ठेवल्या असतील, तर या झोंपड्यांतील माणसें कुत्र्यामांजराच्या जागेंत राहात होतीं.

त्यांच्या गप्पांकडे माझें फारसें लक्ष नव्हतें. मी त्यांच्या परिस्थितीचा विचार करीत होतों. आणि त्यांच्याकडे जेव्हां माझें लक्ष गेलें तेव्हां एका पळवून नेलेल्या मुलीची वृत्तपत्रांतील हकीकत ते वाचीत असल्याचें मला दिसून आलें. पंचवीस वर्षांचा एक काळा सावळा पण तेजदार डोळ्याचा तरुण वाचीत होता आणि बाकीचे ऐकत होते अगदीं रंगून गेले होते ते त्या गोष्टींत. तो वाचणारा तरुण मधेंच थांबून आपला मार्मिक शेरा त्या मंडळीला ऐकवी आणि मग सारेजण सात मजली हंशा पिकवित. ( अरे हो, पण त्या झोपड्यांना मजले नव्हते हें मी लिहिण्याच्या भरांत विसरलोंच. पण राहूंद्या आतां. ) वाचन चालू असता एक परकी इसम आपलें बोलणें लक्षपूर्वक ऐकत आहे, आपल्या हालचाली पहात आहे याकडे त्यांचें लक्ष नव्हते.

आणि वाचन संपताच त्या सर्वांची नजर माझ्याकडे वळली. तेव्हां जणु मी त्यांच्या खिजगणतींत नाहीं अशा झोकानें त्यानीं माझ्याकडे पाहिलें. आजुबाजूला कुत्रीं आणि मांजरं खेळत होतीं; काहीं दगड पडले होते आणि माझीही त्यातच गणती त्यांच्या दृष्टिनें.

त्यांच्या गप्पा पुनः सुरू झाल्या.

त्यानें दुसरी एक बातमी वाचून दाखविली.

पुनः हंशावर हंशा.

त्यानंतर मात्र त्या तरुण गृहस्थाचें माझ्याकडे लक्ष गेलें. माझ्याकडे म्हणण्यापेक्षां माझ्या हातातील पुडक्याकडे म्हटल्यास योग्य होईल. व्यायामाचे कपडे बांधले होते त्याच्यात.

माजरीच्या दृष्टीनें तो त्या पुडक्याकडे पहात होता. निश्चळ दृष्टीनें पाहून कांहीं वेळानें त्यानें मला विचारलें,

“ साहेब, जरा देता का तो पेपर इकडे ? ”

त्याच्या दृष्टींत उत्सुकता आणि आर्जव भरून राहिलीं होतीं.

“ अरे टाइम्सचीं जुनीं पानें आहेत तीं ! ” मी ओशाळून म्हटलें.

“ जाऊं द्या, जाऊं द्या ! चालेल. मला जरा ते फोटो बघायचे आहेत ! ” तो आतुरतेनें म्हणाला.

मी पुडकें सोडून टाइम्सचीं पानें त्याच्या स्वाधीन केलीं. त्यानें जवळजवळ हिसकावून घेतलीं तीं माझ्या हातून.

त्यानें उघडून पाहिलें, आणि एका फोटोकडे पाहून तो आवेगानें उद्‌गारला.

" माय लव्ह ! माय लव्ह !! "

त्यानें तें चित्र आपल्या उराशीं बिलगून धरलें.

पुनः एकदां डोळ्यासमोर धरून त्यानें तें चित्र डोळे भरून पाहिलें आणि तो ओरडला.

" माय् लव्ह ! माय लव्ह !! "

त्यावेळचा तो अभिनय करुणास्पद होता. ताटातूट झालेल्या प्रेयसीचा फोटो पाहून एकाद्या सिनेमा नटानें अभिनय करावा याची कोणालाही आठवण झाली असती त्यावेळीं.

त्या टाइम्सच्या पानावर सिनेमा नटींचे फोटो होते. आणि ज्या फोटोवर तो इतका बेहद्द खूष झाला होता ती अनेक आठवडे गाजलेल्या एका बोलपटांतील प्रमुख नटी होती.

त्याची जणुं समाधी लागली होती. त्याचे डोळे अर्धे उघडे, अर्धे झांकलेले दिसत होते. एकाद्याला आवेगानें उराशीं धरावें तसें त्यानें त्या चित्राला कवटाळलें होतें. मधून मधून तो त्याला दृष्टीसमोर धरी आणिं त्याचीं अनेकवार चुंबनें घेई.

त्याला वेड तर लागलें नाहीं, असा मला संशय येऊं लागला. सिनेमाचें वेड असलेले अनेक लोक असतात त्यापैकीं तो एक असावा असें मला वाटलें.

काहीं वेळानें तो शुद्धीवर आला. त्यानें डोळे उघडून माझ्याकडे पाहिलें. आणि म्हटलें, " साहेब असू द्या हा कागद माझ्याकडे ! "

त्याच्या मागणींतील तो आर्जव इतका हृदयस्पर्शी होता कीं, मी मानेनें नकळत त्याला संमती दिली.

इतक्यांत चर्नीरोडच्या बाजूनें एक मोटार आली. मोटरमधून एक तरुण गुजराथी मुलगी बाहेर पडली. तिच्या पाठोपाठ एक गुजराथी तरुणही उतरला.

कैवल्यधामाजवळ मोटार थांबल्यामुळें आमचें लागलेंच तिकडे लक्ष गेलें. तीं दोघें आतां पायींच चालूं लागलीं होतीं.

त्याना पाहून त्यानें आपले दांत ओंठ चावले. मुठी वळविल्या आणि त्वेषाने तो ओरडला.

‘ साला ! ’

मी त्याच्या या संतापाचें कारण न उमजून त्याच्याकडे पहात राहिलों. तो अगदीं निश्चल दृष्टीने तीं दृष्टीआड होईपर्यंत पहात होता. ‘ साला पोरी घेऊन फिरतोय् न् आम्ही -’ त्याने रागाने ओंठ चावले.

‘ कोण आहेत ते ? ’ मी भीत भीत विचारलें.

‘ आमच्या मालकाचा नालायक कारटा ! नट म्हणजे काय तें माहीत नाहीं न् मोटरच्या कारखान्याचा मालक म्हणून मिरवतोय बेटा ! पोरींसाठीं वाटेल तसे पैसे उधळतो...आम्हाला आज सात वर्षें वीस टिकल्या ! हॅऽनको हें जिणं ! ’

‘ मोटरच्या कारखान्यांत असतोस का तूं ? ’

‘ नाहीं तर काय ! आम्ही मर मर मरतों न हे खुशालचेंडू मोटरी उडवितात-याना रोज रोज नव्या पोरी लागतात फिरायला ! ’

तशा स्थितींत आणखी प्रश्न विचारून त्याला भडकविणं मला योग्य वाटलें नाहीं. मी विचार करीत पुलाच्या पायऱ्या चढूं लागलों.

त्यानंतर तीन चार महिन्याचा काळ गेला असेल. पण त्या झोंपडी-जवळ माझी त्याची भेट झाली नाहीं पुनः. मीही आपण होऊन चौकशी केली नाहीं कोणाजवळ. प्रत्येक माणसाच्या आयुष्यांत अनेक प्रकारच्या व्यक्ति येऊन जातात. परंतु, त्या सर्वांचीच वास्तपुस्त आपण करतों असं नाहीं. त्या येतात आणि जातात. त्याची माझी भेट झाली नाहीं तरी ती व्हावी असे मात्र कधीं कधीं मला वाटत असे. मनुष्यस्वभावाचा तो एक वैशिष्ट्यपूर्ण नमुना होता. म्हणूनच त्याची पुनः भेट व्हावी, तो काय करतो हें समजून घ्यावें असे वाटत होतें. आणि त्या दिवशीं तर त्याची आठवण मला सारखी होत होती.

मी गांवदेवीच्या बाजूनें जात होतों. वाटेंत त्याच्या मालकाच्या मुलाची मोटार जात असलेली माझ्या दृष्टीस पडली. त्यामुळें त्याची स्मृति मला अत्यंत तीव्रतेनें झाली. त्या दिवसाची आठवण पुनः पुनः करीत मी चालूं लागलों.

संध्याकाळचा सहा साडेसहाचा सुमार झाला होता. काळोख नुकताच पडूं लागला होता. केनेडी ब्रिजवर मी येऊन पोचलों. मी समोर पाहिलें.

पुलाच्या भिंतीला टेकून तो वर पहात होता. त्याच्या अंगावर फाटके, मळके कपडे होते. केस पिंजारलेले, चेहरा भेसूर आणि डोळे खुनशी दिसत होते.

तो समोरच्या जागेतील दृश्य पहाण्यात स्वताला विसरून गेला होता. माझी तिकडे दृष्टी गेली. येथें वर्णन करून सांगता न येण्याजोगें दृश्य तेथें होतें. आणि तेथें तर त्याची दृष्टी खिळून राहिली होती. तेथील दृश्याचें वर्णन केलें तर वाचक मला अश्लील लेखक ठरवितील तेव्हां त्या भानगडींत न पडलेलेंच बरें.

आतील दृश्याच्या अनुरोधानें त्याच्याही मनोवृत्तींत बदल होत होता. त्याच्या चेहऱ्यावर कधीं मुग्ध हास्य दिसत होतें तर कधीं तो खद खदा हांसत होता. त्याला जणूं वेड लागलें आहे असाच कोणीही तर्क केला असता.

त्याच्या अगदीं जवळ जाऊन मी खांद्यावर हात टेविला. परंतु माझा स्पर्श त्याला जाणवला नाहीं. आणि जेव्हां कुठें त्याला गदगदा धरून हालविला, तेव्हां त्याचें माझ्याकडे लक्ष गेलें. माझ्याकडे पुरेतपणीं न पहातां त्यानें मला दूर लोटून दिलें आणि पूर्ववत् तो समोर पहात राहिला

मी पुनः त्याच्या खांद्यावर हात टाकला. त्यानें रागानें मागें वळून पाहिलें आणि माझ्या श्रीमुखांत एक भडकावून दिली.

आमच्या या गडबडीकडे लक्ष जाऊन समोरील खिडकी केव्हांच बंद झाली होती.

मी गाल चोळीत उभा राहिलों होतों, खिडकी बंद झाल्यामुळें त्यानं माझ्याकडं रागानें पाहिलं. त्याच्या दृष्टींत क्रोधाग्नि तळपत होता. पण हळूहळू तो थंड होऊं लागला; त्याच्या दृष्टींत मार्दव आलं. माझ्या जवळ येऊन त्यानं हात जोडले.

" साहेब, माफ करा ! मी तुम्हांला ओळखलं नाहीं मघाशीं ! ' तो आर्जवानं म्हणाला.

" अरे, होतास कुठं तूं हल्ली ? त्यानतर भेटला नाहींस ! "

" असतों जगाच्या पाठीवर ! '

" नोकरीला जात नाहींस वाटतं ? "

" सुटली - "

" सुटली ? ती कशी ? "

" हॅं ! " त्यानें आपले ओंठ चावले. " मालकाच्या पोरामुळें सुटली. त्याच्या मोटरींतल्या पोरीकडे पाहिलं म्हणून घालवून लावलं त्यानं मला ! "

" असं ! मग काय करतोस तूं सध्यां ? "

" काहीं नाहीं ! "

" इथं काय करीत होतास ? "

तो शरमेनं लाजल्यासारखा झाला. तो काहीं बोललाच नाहीं.

" बर, जातों मी ! " तो खालच्या मानेनंच म्हणाला.

" थाब, आपण त्या हॉटेलात चहा घेऊं थोडा ! तुला भूकही लागली असेल नाहीं ? "

" भूक ? ऊं " असें कांहींसे चमत्कारिक उत्तर देऊन तो तेथून चटकन् निघूनसुद्धा गेला.

त्याच्या आयुष्याचा विचार करीत मी त्याला पुढं विसरूनच गेलों होतो म्हणाना ! त्या एका वर्षाच्या काळात तो मला चुकूनही कोठें भेटला नाहीं.

त्यानतर एकदां लोकल गाडींतून मी प्रवास करीत होतों. दादरला

मी उतरलों. रेल्वेच्या फाटकाबाहेर आलों तेव्हां माझ्या मागून एक जोडपें येत होतें.

मी त्यांच्याकडे वळून पाहिलें आणि त्यानींही माझ्याकडे त्याच-वेळीं पाहिलें.

मी त्याला ओळखलें; पण थोड्या उशीरांच. त्याच्यांत मला बरेंच परिवर्तन घडून आलेलें दिसलें.

त्याचा चेहरा तजेलेदार दिसत होता. त्यावर प्रसन्न गंभीरपणा आला होता. कपड्यांत कमालीची टापटीप दिसून येत होती. एका उनाड, वेड्या, तरुणाच्या ऐवजीं एक संसारिक गृहस्थ माझ्यासमोर असल्याची जाणीव मला तीव्रतेनें झाली.

त्यानें मला नमस्कार केला. पण तो किती शालीनतेनें!

मीही त्याला प्रतिनमस्कार केला.

"साहेब, कुठं चाललां?" त्यानें प्रश्न केला.

"इथंच एका मित्राकडे चाललों!" मी उत्तर दिलं; "सध्यां काय करतां तुम्ही?" त्याला अरे म्हणण्याचं धाडस करवलें नाहीं.

"मोटरी दुरुस्त करण्याचं एक दुकान काढलं आहे मी दादरला. एकदां पायधूळ झाडा आमच्या घरीं!"

"असं? छान! छान!"

"न् या आमच्या मिसेस!" त्याच्या डाव्या हाताकडे असलेल्या स्त्रीकडे बोट दाखवित तो म्हणाला.

त्यानें तिच्याकडे अभिमानानें पाहिलें. त्याच्या डोळयांत मला तेज दिसलं.

आम्ही परस्परांचा निरोप घेतला.

मी चालतांना त्याच्या परिवर्तनाचा विचार करीत होतों.

"या आमच्या मिसेस!" या त्याच्या वाक्यांत त्याच्या अंतरीचें समाधान व्यक्त होत होतें. तें वाक्य माझ्या कानांत सारखें घुमत होतें.

---

# खारवा ! : ७

आनंदाच्या वेळीं कित्येकदा दुःखाचाही विचार माणसाच्या मनांत सहज डोकावून जात असतो. आपली दीर्घकालची सफर संपवून इद्रूस येणार, तो आपणास भेटणार आणि चार महिने तरी त्याच्या संगतींत एकत्र रहायला मिळणार याचा फाऊलच्या मुग्ध मनाला विलक्षण आनंद होत होता. तरीही या खेपेलासुद्धा तो मागच्यासारखाच स्वच्छंद वागणार आणि आपला छळ होणार काय ? असा प्रश्न तिच्या मनांत वारंवार उभा राहून तिच्या मनाला कष्टी करीत होता त्याच्या भेटीला ती अत्यंत उत्सुक झाली होती. उभ्या वर्षातून अवघे चार महिनेच मिळणारा त्याचा सहवास तिला अपुरा वाटत असे. बाकीच्या दीर्घकालात क्वचित् फत्तेमारी गावांत आलीच तर चारदोन वेळां थोडीशी भेट व्हायची. त्यामुळें आता पावसाळयांत चार महिने तो आपल्याजवळ अखंड रहाणार हा विचार तिला किती तरी सुखकारक वाटत होता.

पण हे चार महिने तो पूर्वीसारखेच चैनींत घालविणार, का पूर्वीसारखाच तो दारू पिऊन धुंद होणार, का पूर्वीसारखाच पैशांसाठीं आपणास त्रास देणार ? असे विचारही तिला सोडून जात नव्हते. आठ महिने समुद्रावर मर मर मरावें, पैसा कमवावा आणि जमविलेली पुंजी चार महिन्यांत दारूपायीं उधळून टाकावी हा त्याचा क्रम कसा नाहींसा करावा ? यंदाही तो असेंच करणार. पाण्याने बांधलेलें त्याचें मन जमिनीचा वारा लागतांच बेताल होतें. छे; याला कांहींच उपाय नाहीं का ?

बिचारी फाऊल ! आनंद आणि दुःख या दोन्ही भावनांनीं तिचें मन गोंधळून गेलें.

आणि इकडे इद्रूस जोरजोरानें वल्हीं मारीत होता. पावसाचे दिवस जवळ जवळ येत होते. लाटांचे नर्तन जरा जास्त स्वैर होत होतें. इद्रूस त्यांच्याकडे लक्षपूर्वक पहात पहात आपलें काम करीत होता. लाटांच्या त्या क्रीडेंत त्याला फाऊल दिसत होती. ती त्यांच्यासारखीच खेळकर, खोडकर आणि चंचल अशी त्याला दिसली. जणु फाऊलच त्या लाटांतून आपल्याकडे पाहून हंसत आहे असें त्याला वाटलें. त्याचा ऊर उत्साहानें भरून आला. त्याच्या बाहूंत शक्तीचा अपरंपार संचार झाला— आणि तो जोराजोरानें वल्हीं मारूं लागला —फाऊल केव्हा भेटेल हा एकच विचार त्याला गोड वाटत होता.

तो मनात विचार करीत होता —कांहीं झालें तरी या खेपेला माझ्या फाऊलला त्रास द्यायचा नाहीं. ही पैशाची थैली तिच्याच स्वाधीन करायची आणि ती सांगेल तसें वागायचें. तिनें आपण होऊन दिलेच कधीं पैसे तर घ्यायचे. दारू ? छीः ! फाऊल समोर असतांना दारूचें नाव तरी कसें आठवेल आतां ? आतां–फाऊल, तुझी ती कलिंगडाची बाग पार मोडून टाक. किती तुझ्या सुकुमार हाताला कष्ट देणार ? त्या चुडताच्या घरांत तरी किती दिवस रहाणार आहेस ? ही पैशांची रास घे आणि काय वाटेल तें कर त्याचें. तुझी तूं मुखत्यार आहेस. किती त्रास दिला मी तिला. हो, गेल्याच खेपेची गोष्ट. गोकुळ-अष्टमीचा दिवस होता. आमचे सारे दोस्त सुरब्राच्या गुत्त्यावर चालले होते. मलाही हुक्की आली. फाऊलकडे पैसे मागितले, पण ती देईना. जंग जंग पछाडले आणि त्या रागानें मी तिच्या तोंडांत मारली. कोल-मडून पडली ती खालीं. आणि गाल लाल लाल झाले तिचे. इद्रूस, असेंच का करणार आहेस तूं या खेपलाही ? नाहीं नाहीं, माझ्या फाऊलला मी नाहीं बरें असें करणार या खेपेला !

मालवणच्या बंदरांत फत्तेमारी हळू हळू शिरत होती, तरीही इद्रू-सचे विचार चाललेच होते. त्यानें वेळेवर दूर निरखून पाहिलें. बरीच

मंडळी जमली होती वेळेवर. इतक्या लांबूनही त्या गर्दींत उभी असलेली फाऊल इद्रूसनें ओळखली. तिची पट्ट्यापट्ट्याची साडी, गुढघ्याच्या वर चापचोपून मारलेला काचा, लुगड्याला शोभेल असा लांब हातांचा पोलका, कानावरून घेऊन उलटे बांधलेले केस आणि त्याच्यामध्यें इद्रूसला मोहिनी घालणारा तिचा मुखचंद्रमा—हीं इद्रूसला डोळ्यांपुढें दिसूं लागलीं. आणि किनाऱ्याजवळ फत्तेमारी येतांच तर तेथें उभी असलेली फाऊल त्याच्या दृष्टीस पडली.

दोघेंहीं परस्परांकडे पाहून हंसलीं.

घरीं जाण्यास निघतांना तिच्या हातीं पैशांची पिशवी देत इद्रूस तिला म्हणाला, " हल्लीं कापूस महाग झाला फार फाऊल ! "

" हो, फत्तेमाऱ्या भरून तो बाहेर जाऊं लागला ना, मग महागच व्हायचा ! " तिनें हंसत हंसत उत्तर दिलें.

तो तिच्या उत्तरानें अगदीं खूष होऊन गेला.

" समुद्राचं पाणी बाधलेलं दिसतं ! " तिनें म्हटलें.

" खारं पाणी माझ्या प्रकृतीला मानवत नाहीं—फाऊल ! "

" अगदीं हाल होतात नाहीं खाण्यापिण्याचे ? "

" जवळ पाण्याचा पर्वत असून पितां येत नाहीं, धनधान्यानं फत्तेमारी भरलेली असूनही तिकडे दुर्लक्ष करावं लागतं. "

अर्ध्या वाटेवर आल्यावर इद्रूसनें विचारलें, " यंदा तरी घर बांधणार आहेस की ? "

" वानराचं नि आमचं घर बहुतेक एकाच वेळीं बांधून होईल ! " तिनें मिस्किलपणें उत्तर दिलें.

तिच्या बोलण्यांतील खोंच तो उमजला. पण त्यानें उत्तर केलें नाहीं.

" कलिंगडाचा मोसम कसा काय गेला ? "

" अशी आणखी एक लहानशी पिशवीच तुम्हाला सांगेल काय तें ! "

" वा, वा ! छान ! नशिब आपलं कीं यंदा मलाही बरकत बरीच झाली. ही पिशवी तुला एवढीशी दिसते, पण नोटा मोजण्यासाठीं तुला शाळेंत जाऊन शिकावं लागेल ! "

" असं ! "

" खारव्याचं नशिब केव्हां उघडेल तें सांगतां येत नाहीं. "

" समुद्राच्या तळाशीं मोत्याचे शिंपले तर नाहीं ना सांपडले ? "

" राजापूरची एक फत्तेमारी अडकून पडली होती. त्यांचा खारवा होता असा–तसाच. इतक्यांत आमची फत्तेमारी तेथें आली. त्यांनीं मला विनवणी केली. आमच्या तांडेलानंही सांगितलं. घेतली उडी मी दर्यांत. तळाशीं जाऊन पाहिलं नि अर्ध्या तासाच्या आंत सुटली त्यांची फत्तेमारी. चांगलंच बक्षिस मिळालं मला फाऊल ! " तिच्याकडे अभिमानानें पहात तो चालूं लागला.

" मग काय विचार आहे, घर बांधायला हरकत नाहीं ! " तो पुढें उद्गारला.

फाऊलनें एक निश्वास सोडला.

उजव्या हातानें गळयांतील क्रॉस सारखा केल्यासारखें करीत ती म्हणाली, " सगळं खरं ! पण तो गुत्तेवाला बांधू देईल तेव्हां ना ! "

इद्रूस चमकला. तिचें तें उत्तर त्याच्या जणूं काळजालाच जाऊन झोंबलें. दीनवाणीनें तो म्हणाला, " असं नको बोलूंस ग, फाऊल ! या खेपेला मी चांगला वागेन बरं ! "

" पाहूं काय करतां ते ? " ती उद्वेगानें उद्गारली.

बराच वेळ दोघांतही स्तब्धता होती. काय बोलावें हेंच त्यांना कळत नव्हतें. इतक्यांत तीं माडीच्या दुकानाजवळ येऊन पोंचलीं. दुकानदार सुरबा यानें इद्रूसला पाहून हांक मारली, " काय इद्रूस, आलास ? ये, थोडा वेळ बसून जा ! "

" नाहीं. जातों आतां ! "

" अरे, ताजी माडी आली आहे आतांच घे ग्लासभर अन् हो हुशार ! हाल झाले असतील तुझे दर्यावर, नाहीं ? "

माडाच्या बनांतील ती माडी विकण्याची झोंपडी इद्रूसच्या मनाला विश्रांतिस्थळच वाटलें. ताज्या माडीचें नांव काढतांच त्याच्या तोंडाला पाणी सुटलें. दर्यावर असतांना अशी चीज कोठली मिळायला ? माडीची

आठवण येऊन केव्हा एकदां हें बंधनमय आयुष्य संपतें आणि मोकळे-पणानें चैन करायला मिळते असें त्याला होऊन जात असे. आणि आतां प्रत्यक्ष इच्छित वस्तूच जवळ असतां त्याच्या मनाची चलबिचल झाल्यास नवल नाहीं.

तो कंटाळला होता. चैनीला त्याचें मन लालसावलें होतें. पण तो विवेकानें फाऊलची आठवण करून त्याला बंधन घालीत होता.

सुरबानें हांक मारतांच तो क्षणभर आपला निश्चय विसरला. फाऊलला नुकतेंच दिलेलें वचन विसरला. त्याचें पाऊल नकळत बाजूला वळलें. त्यानें हळूच भीतीयुक्त अंतःकरणानें फाऊलकडे तिरप्या दृष्टीनें चोरून पाहिलें—

आणि तो जागच्या जागीं थबकला.

तिची दृष्टी त्याला विलक्षण हुकमी दिसली. त्यानें आपलें पाऊल मागें घेतलें आणि तिच्या बरोबर मुकाट्यानें चालूं लागला.

वाटेंत कोणी कोणाशीं बोललें नाहीं.

संध्याकाळीं मित्राना भेटायला म्हणून बाहेर पडलेला इद्रूस काळोख पडला तरी परत आला नाहीं. फाऊल त्याची वाट पाहून थकली. कुशंकेनें तिचें मन घाबरून गेलें. आतां तो परत कोणत्या स्थितींत येतो याचीं कल्पनाचित्रें ती आपल्या मनाशीं रंगवूं लागली. त्यानें दिलेलें वचन आठवून तिचें मन जरासें स्वस्थ होई. पण तिला खात्री नव्हती. कारण त्याचीं वचनें खोटीं ठरण्यासाठींच असतात अशी तिची अनुभवानें खात्री पटली होती. पुन: तो मागच्यासारखाच वागला तर काय करावें याचा ती विचार करूं लागली. कडक उपाय योजणें तिच्या हळव्या मनाला पटेना. आठ महिने वर आकाश आणि खालीं पाणी अशा स्थितींत रहायचें. कोणत्याही गोष्टीचें सुख कल्पनेनेंच भोगा-यचें, कडक बंधनांत रहायचें—केवढें हें दिव्य! असें तिच्या मनाला वाटलें. कोंडून ठेवलेलें पाणी बांध फुटतांच नाहीं का शतवेगानें पुढें जात! हा विचार मनांत आला कीं तिला त्याची दया येई. पण असें कोठवर चालायचें?

इतक्यांत अंधारांतून कोणी तरी धडपडत येत असल्याचा तिला भास झाला.

इद्रूसच होता तो. कसेबसें त्यानें झोंपडीचें दार गांठलें आणि तो आडवा पडला.

त्या घाणीनें तिला भिरभिरी आली.

तिनें पाणी शिपडून त्याला शुद्धीवर आणलें.

" कोण ' सुरबा ! मला आणखी एक दे रे ! "

फाऊलनें पाण्याचें भांडें त्याच्यापुढें केलें. तो घटाघट प्याला.

" आणखी ! "

तिनें आणखी पाणी दिलें. पण पाण्याची चव कळण्याइतका तो शुद्धीवर आला होता.

त्यानें डोळे विस्फारून पाहिलें.

समोर सुरबा नाहीं, फाऊल आहे असें त्याला कळून आलें. तो किंचित् शरमला.

" फाऊल, फाऊ—! " अडखळत बोलत तो फाऊलच्या पायाशीं पडला.

फाऊलनें त्याला हळू उचलून बिछान्यावर निजवलें.

सकाळीं जागा झाला तेव्हां रात्रींचा प्रसंग आठवून त्याला शरम वाटली. फाऊलला तोंड दाखविण्यास त्याला लाज वाटूं लागली.

तिची गांठ पडतांच त्यानें पुनः तिची क्षमा मागितली.

पण त्याचें महत्त्व न मानण्याइतकी फाऊल आतां शहाणी झाली होती.

त्या सबंध दिवसांत त्याचें फारसें संभाषण झालें नाहीं. जसजशी संध्याकाळ होऊं लागली तसा इद्रूस उतावीळ होऊं लागला. त्याला चैन पडेना. बाहेर जाण्याचा विचार त्याच्या डोक्यांत थैमान घालूं लागला. फाऊल त्याला न सांगतां कोठें गेली होती. काळोख पडेपर्यंत ती आली नाहीं परत. तेव्हां आतां पसार व्हावें असा तो निश्चय करूं लागला. पण पैसे कुठें होते ?

त्यानें सारें घर पालथें घातलें. पण पत्ता लागला नाहीं. आतां जावेंच बाहेर असा तो विचार करतो इतक्यात फाऊल आली. ती तडत आंत गेली.

" कुठं होतीस इतका वेळ? "

" शेजारीं गेली होती. "

" अं थोडे—हे देतेस का? "

" कशाला? "

" नाहीं. सहज—" पण तो बोलण्यांत अडखळला. त्याला सरळ उत्तर देतां येईना.

तो जागच्या जागीं घुटमळत राहिला.

" बाहेर जाण्याची गरज नाहीं आज. या इकडे आंत!"

तिनें त्याला हाताला धरून आंत नेलें.

आंत दारूच्या दोन बाटल्या पाटावर मांडून ठेवल्या होत्या. जवळच एक ग्लासही होतें.

दारूच्या दोन बाटल्या आणि त्या आपल्या घरांत असाव्या हें पाहून इद्रूस चमकला. तो फाऊलकडे टकमकां पहात राहिला.

" पहातां काय असे? घ्या ना!"

" फाऊल, तूं माझी थट्टा करतेस? "

" थट्टा कशाला करणार? संपवून टाका त्या!"

" सकाळच्या वचनाची मला अजून विस्मृति पडलेली नाहीं!'-इद्रूस मोठ्या निश्चयानें छाती पुढें काढून म्हणाला. " मला तूं अग' दींच कच्च्या दिलाचा समजतेस? छे, छे! दारूला स्पर्श करणार नाहीं याउपर, फाऊल! उचल तें वीष माझ्यासमोरून!"

फाऊलनें त्या बाटल्या मुकाट्यानें उचलून ठेवून दिल्या. ती एक चकार शब्द बोलली नाहीं. तिनें त्याला जेवायला वाढलें. आपल्याला आवडणारे चार जिन्नस त्यानें पोटभर खाल्ले आणि तो झोंपी गेला.

चार दिवस त्यानें योठ्या निश्चयानें काढले. सुरबाच्या दुकानासमोरून तो मोठ्या दिमाखानें सरळ गेला. पांचवे दिवशीं मात्र त्याचा

निश्चय थोडा डळमळूं लागला. मनांत हजार विचार येऊं लागले. तो घरीं सारख्या येरझारा घालीत होता. त्याच्या डोक्यांत कोणत्या विचाराचें थैमान चाललें आहे हें फाऊलला ओळखायला वेळ लागला नाहीं. ती स्वस्थ राहून त्याच्या हालचालीकडे लक्ष ठेवीत होती. त्या दिवशीं तिनें त्याच्यासाठीं नवें धोतर, सदरा, छानशी टोपी आणि वहाणा आणल्या होत्या.

"पाहिलंत का? किती छान टोपी आहे ती!"

"हें काय आणलं आहेस?"

"पहा तर खरं! असली टोपी अन् धोतर हवं होत ना?"

"खरं. पण उगच कशाला भलतीच चैन हवी?"

शेवटीं तिचा आग्रहच झाला तव्हा त्यानें त्या वस्तू ठेवून घेतल्या आणि धोतर नेसून तो दुसरे दिवशीं तिच्याबरोबर चर्चमध्येंही गेला.

चर्चमधून घरीं आल्यावर तो आपली टोपी पेटींत ठेवीत असतां त्या बाटल्या त्याच्या हातीं लागल्या. त्यानें अधाशासारख्या त्या उचलून घेतल्या परंतु भानावर येण्यास त्याला वेळ लागला नाहीं.

"फाऊल, काय हें? तुला सांगितलं ना, हें वीष घरांत नको म्हणून! फेकून का नाहीं दिलंस?"

"असूं द्या, असूं द्या! न जाणों, तुम्हांला त्याची गरज लागायची कोणा वेळा. आपल्या संग्रहीं असलेल्या बऱ्या!"

तिनें त्या बाटल्या घेतल्या आणि येशू ख्रिस्ताची तसबीर ज्या खोरणांत ठेवली होती त्याच्याजवळच्या दुसऱ्या खोरणांत त्या ठेऊन दिल्या. इद्रूसला तिच्या कृतीचा अर्थच कळेना.

त्यानंतर इद्रूस प्रार्थना करी त्या त्या वेळीं त्या दोन बाटल्यांकडे त्याचें लक्ष जाई; आणि त्या दोन बाटल्याकडे त्याचें लक्ष जाई त्या त्या वेळीं त्याचें येशूच्या मूर्तीकडे लक्ष जाई.

---

# हिंदुराव : ८

गाडींत प्रवेश करतांच हिंदुराव अगदीं खूप होऊन गेले. साऱ्या डब्यांत आपल्याखेरीज एकही उतारू नाहीं या विचारानें त्यांना समाधान झालें होतें. त्यांनीं आपली बॅग एका सोईस्कर बांकावर ठेवून एक लांबलचक बांक आपल्या ताब्यांत घेतला. कोणी येऊन आपणाला उपद्रव देऊं नये आणि थेट दिल्लीपर्यंतचा प्रवास सुखकर व्हावा यासाठीं इतर उतारू येण्यापूर्वींच बांक अडवून ठेवण्यासाठीं त्यांनीं आपला देह बांकावर ऐसपैस केला. आणि ते आपल्याला सोबत करण्यास आणखी कोणी येतात याची वाट पहात दरवाजाकडे दृष्टि ठेवून पहात राहिले.

गाडी सुटण्यास अजून पुरा एक तास होता. उतारूंची फारशी गर्दी झालेली नव्हती. पडल्यापडल्या हिंदुराव विचार करूं लागले. दिल्ली येथें भरणाऱ्या अखिल भारतीय हिंदुमहासभेच्या अधिवेशनाला हजर राहाण्यासाठीं ते त्रिकाळगांवांतर्फे प्रतिनिधि म्हणून चालले होते. हिंदु-महासभेला प्रतिनिधि म्हणून जाण्यासाठीं गांवांतील अनेक कट्टर हिंदु पुढारी अहमहमिकेनें पुढे झाले होते. पण विजयश्रीनें हिंदुरावांच्याच गळ्यांत माळ घातली. त्यांचें आजवरचें वक्तृत्व, हिंदुसमाजाबद्दल त्यांना वाटणारी काळजी, सरहद्दीवरील हिंदु आज कोणत्या स्थितींत आहेत या-बद्दल वाटणाऱ्या काळजीनें झालेल्या त्याच्या चेहऱ्याची दुर्दशा, केसरी-सारख्या पत्रांत मुसलमानांनीं पळविलेल्या हिंदु स्त्रियांच्या रोमांचकारी हकिकती वाचून त्यांनीं दिलेलीं व्याख्यानें या प्रचंड कामगिरीनें त्रिकाळ

गांवांतील वृद्ध माणसांना त्यांच्याबद्दल फारच आशा वाटूं लागली होती. आणि नुकतेच एका स्थानबद्ध हिंदु पुढाऱ्याच्या सुटकेसाटीं त्यांनीं केलेलें जळजळीत व्याख्यान लोकांच्या स्मृतिपटलावर अगदीं ताजें असल्यामुळें आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या महत्त्वाकांक्षेवर पाय देऊन हिंदुराव दिल्लीच्या हिंदुमहासभेचे प्रतिनिधि म्हणून आज दिल्लीला जात होते.

बोरीबदरावर स्टेशनात उभ्या असलेल्या गाडींत हेच विचार पुनः पुनः त्याच्या डोक्यांत येऊन त्याचें मन प्रसन्न होत होतें. आपली आजवरची हिंदुसमाजाबद्दलची कामगिरी लोकानीं जाणली याबद्दल त्यांनीं मनांतल्यामनात स्वतःला धन्यवाद दिले. परंतु एकाच गोष्टीमुळे त्याचें मन कष्टी होत होतें. आणि ती म्हणजे अजूनपर्यंत त्यांना पराक्रम गाजवायला संधि सापडली नव्हती. हिंदु समाजाची शारीरिक अवनति पाहून त्यानीं आपल्या गांवांत एक आखाडा स्थापन केला होता. त्यासाठीं मुद्दाम पुण्याला जाऊन ते दांडपट्ट्याचें शिक्षण घेऊन आले होते. गावातील स्त्रियानाही लाठी फिरविण्याचे शिक्षण देण्याचे प्रयत्न चालू होतें, पण त्यांत त्याना अजून यश आलें नव्हतें. मुसलमान म्हटला कीं त्याच्या पायाची आग मस्तकाला जाऊन पोचत असे. त्याचे दांडपट्ट्यानें बलवान् झालेले बाहु स्फुरण पावूं लागत. एकाद्या वर्तमानपत्रात हिंदु स्त्रियांना पळविल्याची हकीकत आली की तो दिवस त्याना बेचैन जात असे. एकदा त्या सरहद्द प्रांतात जाऊन त्या मुसलमानाचा समाचार घ्यावा असे त्याना स्फुरण चढे. महाराष्ट्रात विशेषतः आपल्या त्रिकाळ गावांतील हिंदु स्त्रियाना असा कोणी मुसलमान पळवून नेईल तर काय बहार होईल असे त्याना वाटे. मग त्या स्त्रियाना संकटांतून सोडवून आणण्याची आपणास संधि मिळेल आणि आपला जिकडे तिकडे गौरव होईल, आपला फोटो छापून येईल; हिंदु वीर म्हणून आपली कीर्ति वाढेल अशीं सुखस्वप्नें त्यांना पडत. त्यांचे मूळचें नांव इंद्रोजीराव असें होतें पण जाज्वल्य हिंदुधर्मप्रेमानें त्यानीं आपलें नांव बदलून हिंदुराव असें ठेविलें. आपलें बारसे आपणच करणारे ते महाराष्ट्रातील पहिले हिंदु होते असें म्हणावयास हरकत नाहीं.

आपली महत्त्वाकांक्षा पुरी होणारा प्रसंग अजूनपर्यंत न आल्याबद्दल ते कष्टी होत. यावेळींही गाडींत पडल्यापडल्या त्यांच्या डोक्यांत हेच विचार येऊन त्यांचा जीव कष्टी झाला. खिन्न मनानें ते खिडकीबाहेर पहात असतां त्यांचे चित्त त्यांत इतकें रंगून गेलें कीं आपला डबा केव्हां भरला आणि उतारू लोक गडबड करू लागले याची त्याना दादही नव्हती. आणि जेव्हा त्यांना कोणी तरी हटकलें, " साहेब बाजू हटो!" तेव्हां ते भानावर आले.

समोर एक पठाण उभा असून तो आपणास बाजूला होण्यास सांगत आहे असे दृश्य त्याच्या डोळयांनीं पाहिलें. त्यांनीं स्वतःला नकळत आपले पाय मागें खेचले आणि उठून बसून त्याला बाकावर बसण्यास जागा करून दिली. रागानें त्यांची छाति धडधडत होती, जीभ कोरडी पडत चालली आणि म्लेच्छाला स्पर्श न करण्याच्या धर्मबुद्धीनें ते अंगचोरपणानें बसूं लागले. त्यानीं तुच्छतेनें आपली दृष्टि सभोंवार फिरविली. त्या दृष्टीने त्यांच्या छातींत जणुं धसकाच बसला. सारा डबा जणुं मुसलमानांनीं भरून गेला होता. एकाद दुसरा हिंदु कुठेंतरी कोपऱ्यांत नाहींतर खालीं बसला होता. एकाद्या प्रचंड मुसलमानांच्या जमावांत एकादी गाय सांपडावी तसं आपलें झालें आहे असें हिंदुरावांना वाटलें.

त्यानीं पाहिलें, डब्यांत पठाण, रामपुरी, पंजाबी मुसलमान बसले आहेत आता प्राप्त प्रसंगाला तोंड देणें आपलें कर्तव्य आहे असें जाणून ते सावधगिरीनें बसले. डब्यांतील उतारूंनीं इतका गलबला चालविला होता कीं, हिंदुरावांचें डोकें तर उठूनच गेलें. सुदैवानें त्याना त्यातील एक अक्षरही कळत नव्हतें. त्रिकाळ गांवात हिंदी शिक्षणाचा वर्ग कॉंग्रेस कमिटीनें काढला होता पण हिंदी शिकण्यानें आपल्या भाषेवर यावनी संस्कृतीचें प्राबल्य बसेल या विचारानें त्यानीं तो नाद सोडून दिला होता.

गाडी सुरु झाली. आणि ती द्रुतवेगानें मुंबईशहराबाहेर पडूं लागली. गडबड करून थकलेले मुसलमान उतारू आस्ते आस्ते झोंपी जाऊं लागले. हिंदुरावांच्या बाकावर बसलेला पठाण तर आतां चांगला घोरूंही लागला होता. त्यामुळें जरा आडवे होण्याची इच्छा त्यांना

मनांतल्या मनांत दाबून टाकावी लागली. आणि शिवाय न जाणों झोपेंत त्यांनीं आपला खून केला तर? आपली गठडी बाहेर फेकून दिली तर? अशा अनेक शंका त्यांच्या मनांत येऊन त्यांनीं झोपण्याचा बेत तहकूब केला आणि डोळयांत तेल घालून ते आपल्या जिवाचें — हिंदु-धर्माच्या एका घटकाचें–संरक्षण करूं लागले. परंतु किती झालें तरी झोंप ही निसर्गाची मुलगी पडली. समता तिच्या पांचवीस पुजलेली. मुसलमानाला झोंप द्यायची आणि हिंदूला नाहीं असा भेदभाव तिच्यांत नसतो. तिनें आपले कोमल करपाश मुसलमानांच्या गळ्याभोंवतीं टाकून त्यांना दृढालिंगन दिलें तसेंच हिंदुरावानाही दिलें.

पहाटेला हिंदुराव एकाएकीं जागे झाले. आपण झोंपलों होतों ही जाणीव त्यांना होतांच त्यांनीं आपली बॅग जाग्यावर आहे कीं नाहीं तें पाहिलें आणि सभोंवार दृष्टी फेंकली. बहुतेक मुसलमान उतारू अजूनही निद्रावश झालेले होते. एकाद दुसरा मुसलमान गार वाऱ्यापासून आपलें रक्षण करण्यासाठीं पांघरूण सांवरीत डोळे किलकिले करून पहात होता.

जळगांवच्या पूर्वी कोणत्यातरी एका स्टेशनवर एक वऱ्हाडी शेतकरी गाडींत चढून हिंदूरावाच्या समोर बसला होता. तो दृष्टीला पडतांच हिंदू-रावांना आनंद झाला. आपली संख्या एकानें वाढली असें त्यांना वाटलें.

इतक्यांत कोणीतरी अस्फुट रडत असल्याचा आवाज त्यांच्या कानीं पडला. त्यांनीं चमकून पाहिलें. त्याच्या उजवीकडच्या कोपऱ्यांत बसलेली एक बुरखेवाली स्त्री आपले डोळे पुशीत असल्याचें त्यांना आढळून आलें. तोंडावरील बुरख्यामुळें तिचा चेहरा त्यांना दिसणें शक्य नव्हतें. पण तीच स्त्री रडत आहे याबद्दल तर खात्रीच. ती रडत आहे असें पाहून तिच्या बाजूला झोंपलेला एक मुसलमान तरुण तिला हलक्या आवाजांत, ‘ रडो मत, रडो मत ’ म्हणून समजावीत होता आणि थोडा धाकदपटशा दाखवीत होता.

हिंदुरावांच्या विचारचक्राला जोराची गति मिळूं लागली. त्यांची कल्पनाशक्ति विमानांतून स्वैरसंचार करूं लागली.

अजूनही ती स्त्री रडतच होती.

आणि हिंदुरावाचें मन अस्वस्थ होत होतें.

तो मुसलमान तरुण उठला. आणि तिच्या तोंडाजवळ तोंड नेऊन कांहींतरी धमकावणीनें बोलला.

त्याबरोबर ती स्त्री अधिकच रडूं लागली. ती कांहींतरी बोलत होती, पण तिचें बोलणें ऐकूं येईपर्यंत हिंदूरावांचे टवकारलेले कान कांहीं लांब पोंचूं शकत नव्हते.

त्या मुसलमानानें पुनः काहींतरी धमकीवजा प्रकार केला.

हिंदुरावाची आतां तर खात्रीच झाली. त्यांनीं आपल्या खिशांतील वर्तमानपत्र काढून त्यामधील एक बातमी पुनः वाचली.

हिंदुसमाजाची सेवा करण्याची संधि आज प्राप्त झाली आहे असें त्यांना वाटलें. ती पडदानशीन स्त्री मुसलमान नसून एखादी हिंदु स्त्रीच असली पाहिजे याबद्दल त्याची बालंबाल खात्री झाली. त्याचा आनंद त्या आगगाडीच्या डब्यात मावेना म्हणून ते गाडी एका स्टेशनवर थाबताच बाहेर उतरून गेले.

बाहेर उभ्या असलेल्या रेल्वे पोलिसाच्या कानांत त्यांनीं कांहींतरी सांगितलें. तो बिचारा पोलीस पहिल्यानें पुढे यायला कबूलच होईना पण हिंदूरावांच्या आग्रहानें तो एकटा डब्यात गेला आणि त्यानें पाहिलें, खरोखरच एक मुसलमानी पोषाखांतील स्त्री हुंदके देत आहे. पण पुढें होऊन चौकशी करण्याचा त्याला धीर होईना. इतक्यांत गाडीची शीळ झाली आणि निराश मनानें हिंदुराव आपल्या जागेवर बसले.

यावेळीं चांगलें उजाडले होतें. आणि सारे मुसलमान उतारू जागे होऊन गप्पा मारीत होते. कोणी कवाल्या म्हणत होते आणि इतर टाळ्या एका तालबद्ध पद्धतीनें वाजवून त्यांना साथ देत होते. कांहींजण आपलें बोचकें सोडून खाना खात होते. एकमेकांना बोलावून देत होते. त्यांच्यांत कांहीं सरहद्दीवरचे, तर कांहीं पंजाबांतील, कांहीं आग्रा दिल्ली येथें जाणारे असे निरनिराळ्या ठिकाणचे मुसलमान लोक

होते; पण पहाणाराला वाटलें असतें ते जणुं एकाच गावचे आहेत, एकाच कुटुंबांतील आहेत. एकाच थाळींत ते खाना खात होते, एकाच सुरईला तोंड लाऊन ते पाणी पीत होते.

हिंदूरावांना तो प्रकार पाहून शिसारी आली. त्यांचें मस्तक भणाणून गेलं.

त्यानीं आपल्या तांब्यांतून पाणी घेऊन स्वच्छ तोंड धुतलें. आणि आपला फराळाचा डबा काढून ते फराळ करू लागले. ज्या हिंदु वऱ्हाडी शेतकऱ्याला पाहून त्यांना अत्यंत आनंद वाटला होता तो समोरच्या बाकावरच बसला होता. त्याची दृष्टि आपल्या फराळाच्या जिन्नसावर पडूं नये म्हणून त्यानीं किंचित् पाठ फिरवून त्याला दिसणार नाहीं अशा बेतानें फराळ करायला सुरवात केली.

दुपारीं थोडी शांतता होती डब्यात. पण हिंदुरावाचें मन अशांत होतें. त्या हिंदु स्त्रीला त्या मुसलमानाच्या तावडींतून कशी सोडवावी याचा ते विचार करूं लागले. ती हिंदु तरुणीच असली पाहिजे याची त्याना खात्री वाटत होती. त्यानीं खांडवा स्टेशनवर गाडी थांबतांच थेट स्टेशन मास्तरच्या ऑफिसची वाट धरली आणि स्टेशनमास्तरला आपल्या हिंदींत–मोडक्या हिंदींत–सर्व हकीगत सांगून आपणास मदत करण्यास विनति केली. स्टेशनमास्तर एक हिंदु गृहस्थच होते ते डब्यांत चढले. त्यानीं त्या मुसलमानाला कुठें जायचें म्हणून विचारलें. दोनचार प्रश्न विचारून ते खालीं आले. हिंदूराव त्याची बाहेर वाट पहात होते. त्यांनीं विचारलें.

" काय, काय झालें ? "

" तुमचा तो निव्वळ तर्क आहे. तसं कांहीं दिसत नाहीं. त्यानं सरळ उत्तर दिलं ! "

" पण तुम्हीं त्यांना दरडावून विचारलं कां नाहीं ? अहो माझी खात्रीच आहे ती हिंदु स्त्रीच आहे. जरा जोरांत विचारायचं कीं नाहीं ? च् च् ! "

" अहो, तसं कसं विचारतां येईल ? एखाद्या सभ्य गृहस्थाला असं विचारून त्याचा अपमान का करायचा ? शिवाय त्याच्या चेहऱ्या-

वर बदमाषगिरीचं किंवा घाबरल्याचं किंचित् चिन्हही दिसत नाहीं!"

"तुमचं चुकतं तं इथेंच. तुम्हां हिंदु लोकांना भलते तर्कवितर्क काढण्याची संवय. त्यामुळंच तुमच्या आयाबहिणी —"

"काय?" स्टेशनमास्तरनीं असें विचारतांच हिंदूरावांनीं आपलें वाक्य अपुरें ठेविलें. ते पुनः आर्जवानें म्हणाले, "मास्तरसाहेब तुमची मी खात्री करून कशी देऊं? पण थांबा-" असें म्हणून त्यांनीं आपल्या खिशांतील "हिंदुधर्म" पत्राचा अंक काढला आणि मास्तरांच्या पुढें करून म्हणाले, "वाचा. मग तरी तुमच्या डोक्यांत प्रकाश पडेल."

"हें काय आहे? मराठी? मला मराठी वाचतां येत नाहीं. आपणच वाचा!" त्यांनीं हिंदींत सांगितलें.

"असं काय! अहो पुण्याला गेल्या आठवड्याचीच गोष्ट; एका तरुण हिंदु स्त्रीला मुसलमानांनीं हातोहात मोटरमध्ये घालून पळवून नेली. आणि तीच बातमी या वर्तमानपत्रात त्या स्त्रीच्या फोटोसह छापली आहे! हा पहा फोटो! तुम्हीं थोडं मनावर घेतल्यास सहज उलगडा होऊन जाईल. तो तिचा बुरखा थोडा बाजूला करा मग ही दुर्दैवी स्त्री तेथें तुम्हांला दिसेल!" वर्तमानपत्रातील बाईच्या फोटोकडे अंगुलीनिर्देश करून हिंदूराव म्हणाले.

"पण बुरखा दूर कसा करणार?"

"आपण अधिकारी आहात."

"छे! छे! अन् भलतच काहीं झालं तर. मुसलमानाशीं गांठ आहे. खून पाडतील खून."

खून म्हणतांच हिंदुरावांनीं एक दीर्घ उसासा सोडला.

एका दुर्दैवी हिंदु स्त्रीला मुसलमानांच्या तावडींतून आपणास सोडवितां येऊं नये याचें त्यांना अत्यंत वाईट वाटूं लागलें. त्यांनीं एक उसासा सोडून आपल्या डब्यांत प्रवेश केला.

गाडी सुरू झाली. आणि हिंदूरावांच्या विचारचक्रांनाही जोराची गति मिळाली. विचारमग्न स्थितींत ते जवळ जवळ तास दीडतास तरी अस-

तील. एकाएकीं त्यांच्या डोक्यांत एक विचार आला त्यांनीं टाळी वाजवून त्यांनीं आपली बॅग उघडली. आणि एका कागदावर इंग्रजीमध्यें लिहिलें.

" पुण्याला पळवून नेलेल्या हिंदु तरुणीला आजच्या गाडीनें पेशावर दिल्लीला नेत आहेत. पकडा."

पुढील स्टेशन येतांच हिंदुरावांनीं स्टेशनवर जाऊन वरील प्रमाणें मुंबईच्या पोलिस कमिशनरला तार ठोकली. आणि सुटलों एकदांचा आपल्या कर्तव्यांतून अशा भावनेनें ते गाडींत येऊन बसले. आतां इतक्यांत बेटे लागतील चौकशीला असें म्हणून ते पुढील घटनेची वाट पहात राहिले.

त्या मुसलमान तरुणाला याची गंधवार्ताही नव्हती. तो आपल्या जातभाईशीं गप्पा करण्यांत गढून गेला होता. आणि ती पडदानशीन स्त्री मधून मधून रडत होती.

सायंकाळीं एका स्टेशनवर कोणीतरी इसम हिंदूरावाच्या डब्यांत शिरला. तो चौकसदृष्टीनें सारा डबा न्याहाळीत होता. विशेषत: त्या मुसलमान तरुणाच्या आणि त्या पडदानशीन स्त्रीच्या हालचालीकडे त्याचें लक्ष वेधून राहिलें होतें. हिंदूरावांना त्याचा संशय आला. त्यांनीं त्याच्या जवळ जाऊन हळूच त्याला कानात विचारलें, " आपण सरकारी मनुष्य आहांत काय ? मुंबईहून तुम्हाला कसला हुकूम सुटला आहे काय ? "

त्या गृहस्थानें हंसून हिंदूरावाकडे पाहिलें आणि त्याना हातानें उगी राहाण्याचा इषारा दिला. नंतर दोघाचें कांहीं वेळ हळू हळू बोलणें झालें.

पुढील स्टेशनवर गाडी थांबतांच एक रेल्वे अधिकारी डब्यांत आला. त्याबरोबर पूर्वीं असलेला इसम त्याच्याजवळ गेला आणि त्याच्या कानांत कांहीं तरी सांगितलें. कांहीं बोलणें झाल्यानंतर ते त्या मुसलमान गृहस्थाजवळ गेले.

" आप किदर जाता है ? कहांसे आया ?' त्या रेल्वे अधिकाऱ्यानें विचारलें.

" मुंबईहून आलों, आग्र्याला जातों आहें! त्यानें उत्तर दिलें.

" ही औरत कोण आहे? "

" माझं नुकतंच लग्न झालं असून मी आग्र्याला जात आहें."

" बुरखा दूर करूं शकाल का? "

" ऐसा न हो सकता! " त्यानें निश्चयपूर्वक उत्तर दिलें. आणि सारे मुसलमान वर्दळीवर आले.

त्या मुसलमानाचा तो उग्र चेहरा पाहून रेल्वे अधिकाऱ्याला कांहीं करतां येईना. थोडावेळ विचार करून तो खालीं उतरून निघून गेला.

बिचारे हिंदुराव, त्यांना कसायाच्या घरांत गाईनें राहावें तसें वाटले. सारे मुसलमान त्यांच्याकडे क्रुद्ध मुद्रेनें पाहात होते. खालीं मान घालून ते बाहेर पहात राहिले.

मुसलमान झालेल्या घटनेची आपआपसांत चर्चा करीत होते. आपण मुडदे पाडूं पण मुसलमान स्त्रीचा पडदा दूर करूं देणार नाहीं असें साऱ्या मुसलमानांनीं त्या तरुण मुसलमानाला आश्वासन दिले.

काय होणार आणि काय नाहीं याचा हिंदूराव विचार करीत होते, मुसलमान गुंडांच्या तावडींतून त्या हिंदु स्त्रीची सुटका होतांच आपला कोण सन्मान होईल. उद्या दिल्लीला गेल्यावर हिंदुमहासभेंत आपल्या नांवाचा जयजयकार होईल. एक ना दोन. सर्वत्र आपले फोटो येतील. त्यांच्या दृष्टीपुढें वर्तमानपत्रांतील आपले फोटो दिसूं लागले. परंतु हाय, आपणास कोणीच मदत करीत नाहीं. आपले सारे मनोरथ फुकट जाणार. इतकेंच नव्हे तर या राक्षसांच्या तावडींतून आपण जिवंत कसे सुटूं इत्यादि विचार त्यांच्या मनांत येऊं लागले. राजाकीमंडी स्टेशन जसजसें जवळ येऊं लागलें तेव्हां तो तरुण मुसलमान आपल्या सामानाची आवराआवर करूं लागला तेव्हां कोठें हिंदूरावांच्या जीवांत जीव आला.

राजाकीमंडी स्टेशनवर गाडी थांबतांच तो मुसलमान तरुण आणि त्याच्या बरोबर असलेली पडदानशीन स्त्री खालीं उतरलीं. हिंदुरावांच्यानें राहवेना. एक हिंदु स्त्री मुसलमानांच्या जाळ्यांत जात आहे याचें त्यांना परम दुःख झालें. शेवटचा उपाय करण्याच्या हेतूनें ते बाहेर उतरले.

तों त्या तरुण मुसलमानाला स्टेशनवर पोलिसांनीं अडविलेलें त्यांना दिसून आलें.

हिंदूराव तांतडीनें तिकडे घुसले. पोलिस अधिकारी त्याला त्या स्त्रीचा बुरखा दूर करायला सांगत आहेत आणि तो ऐकत नाहीं असा प्रकार चालला होता. शेवटीं दोघांनाही पकडून नेण्याची भीति घालतांच तो मुसलमान तरुण थोडासा नाउमेद झाला.

हिंदुरावांना अतिशय आनंद झाला. आतां बुरखा दूर होतांच 'हिंदुधर्म' वर्तमानपत्रांतील तरुणी आपल्या दृष्टीला पडणार असें त्यांना वाटूं लागलें. त्यांनीं तो अंक खिशांतून बाहेर काढून घेतला आणि चेहऱ्यांचें साम्य पाहाण्यासाठीं फोटोचें पान हातीं धरून ठेवलें.

मोठ्या नाइलाजानें त्या मुसलमान तरुणाने तिच्या तोंडावरील बुरखा दूर केला.

हिंदुरावांना विजेचा चटका बसला.

एक षोडशवर्षा लावण्यवती मुसलमान तरुणी आपल्या पुढें उभी असून ती स्फुंदून स्फूंदून रडत आहे असें त्यांनीं पाहिलें. त्यांच्या हातांतील अंक गळून पडला. त्यांचे पाय कापूं लागले.

"बाई तुम्ही कोण आहां?" पोलिस अधिकाऱ्यानें उर्दूमध्यें विचारलें, "आपणाला रडायला काय झालं?"

"मेरी मा! मेरी मा!" तिनें उत्तराऐवजीं असा उद्गार काढला.

"साहेब आमचं नुकतंच लग्न झालं. मी हिला घेऊन आमच्या गांवीं जात आहें. आपल्या आईला सोडून येण्यास ही नाखुषी होती. तिचीच आठवण होऊन ही सारखी रडत आहे!" तो तरुण मुसलमान म्हणाला.

पोलिस अधिकाऱ्यानें रागानें मागें वळून पाहिलें.

पण तिथें हिंदुराव कुठें होते?

मागल्या पायानें पळून डब्यांत बसून ते कधींच दिल्लीला रवाना झाले होते.

---

# बारा नंबरची खोली : १

ताई आणि तिचीं दोन मुलें बऱ्याच वर्षांनीं माझ्या घरीं आलीं असल्यामुळें माझें घर कसें गजबजून गेलें होतें. तशांत दिवस दिवाळीचे. मग कांहीं बघायलाच नको. फटाके वाजविण्यांत मुलें गर्क झालीं होतीं आणि फराळपीठ करण्यांत आई आणि माझी बायको गुंतून गेल्या होत्या.

माझ्या बहिणीचीं मुलें म्हणजे अगदीं प्रेमळ, सारा दिवस खेळत असायचीं आणि रात्रीं माझ्या बिछान्यापाशीं जमून मागें लागायचीं, "मामा, आम्हांला गोष्ट सांगा एकादी." मी तर या दिवसांत कंटाळून गेलों होतों. तीनचार दिवाळी अंकांसाठीं मला गोष्टी लिहाव्या लागल्या होत्या; त्यामुळें नवी गोष्ट मला सुचत नव्हती; आणि मुलगी बऱ्याच वर्षांनीं घरीं आलेली असल्यामुळें यंदांची दिवाळी मोठ्या थाटांत करायचें आईनें ठरविलें, त्यामुळें मी खर्चाच्या पेचांतही बराच पडलों होतों. त्यामुळें मनाला चांगलीशी स्वस्थता नव्हती.

अशा परिस्थितींत माझ्या भाच्यांना मी गोष्ट कसली सांगणार? पण त्यांचा लकडाच इतका प्रभावी होता, कीं गोष्ट सांगितल्यावांचून माझी सुटकाच नव्हती मुळीं.

मी टाळाटाळ करीत आहें असें पाहून माझी बायको भाच्यांच्या कैवारानें म्हणाली, "इश्श! सांगा ना त्यांना एकादी गोष्ट! एवढें मोठे लेखक नि एकादी गोष्ट सुचत नाहीं? शिवाय वन्सं इतक्या वर्षांनीं आलेल्या. त्यांना नको का खूष ठेवायला!—दुसरं कांहीं सुचत नसल्यास गेल्या दिवाळींत घडलेली गोष्ट सांगा!" असें म्हणून ती हंसूं लागली.

" हो, बरी आठवण केलीस ! " मी आनंदून म्हटलें.

माझ्या भाच्यांनींही एकच गिल्ला केला, " मामा, आम्हांला तीच गोष्ट सांगा ! "

" बरं सांगतों तर ! " असें म्हणून मी अंथरुणावर पडलेला उठून बसलों.

तेव्हां ताई, आई आणि माझी बायकोही येऊन बसलीं गोष्ट ऐकायला. आई आणि बायको यांनींच खुद्द गोष्ट घडविली होती; तरी त्यांनाही ती पुन: ऐकावीशी वाटत होती. त्यांच्या तोंडावर आठवणीनें हास्य दिसून येत होतें.

" ऐका हं ! " मी म्हटलें.

आणि सर्वांनीं एकदम हुंकार दिला—" हूं ! "

" त्या दिवशीं मला ऑफिसमधून यायला थोडा उशीर झाला. स्पेनमध्यें मोठं युद्ध सुरू झालं होतं नि त्याबद्दलच्या ताज्या तारांचं भाषांतर संपवीपर्यंत मला नेहमींपेक्षां जास्त वेळ लागला. काम उरकून मी घाईघाईनं घरीं आलों.

घरीं येऊन पाहतों तों कोणी तरी एक मध्यम वयाचे गृहस्थ येऊन बसले होते. मला पाहतांच हातांतलं पुस्तक बाजूला ठेवून त्यांनीं मला नमस्कार केला. मीही प्रतिनमस्कार केला, नि घरांत गेलों.

आईला विचारलं, " कोण आले आहेत आमच्या इकडे ? "

आई थोडी बुचकळ्यांत पडली. क्षणभर थांबून ती म्हणाली, " थांब हं, सूनबाईला विचारून येतें; तिला माहीत असेल ! "

असें म्हणून आई सूनबाईच्या खोलींत गेली. ( यावेळीं माझीं भाचवंडें हंसूं लागलीं. त्यांच्या मामीला मी सूनबाई म्हटल्यानें त्यांना गंमत वाटली. ) मीही आईच्या बरोबर गेलों.

आईनें विचारलं " कोण ग ते ? "

" मला काय माहीत ! " सूनबाईच्या या उत्तरानें आईला आश्चर्य वाटलें. मीही चमकलों.

" म्हणजे ? ते कोण तें तुम्हां दोघींनाही माहीत नाहीं तर ! " मी हलक्या आवाजांत म्हटलें.

दोघीही टकमकां माझ्या तोंडाकडे पाहत राहिल्या.

तेव्हां आईला नि हिला मी एकंदर हकीकत विचारली. त्यांनीं मला सांगितलेल्या हकीकतीवरून मला हंसूं आलें.

तो प्रकार असा झाला होता:

संध्याकाळीं सहा वाजण्याच्या सुमारास एक मध्यम वयाचे गृहस्थ आमच्या दाराशीं येऊन विचारूं लागले, " बारा नंबरची खोली हीच काय हो ? "

" होय ! " आईनें उत्तर दिलें.

" घरांत आहेत का ? " त्या गृहस्थानें विचारलें.

" अजून आले नाहींत. आतां येतील ! " आई म्हणाली.

" मग मी थांबतों तर ! " असें म्हणून हंसत हंसत त्या गृहस्थानें आमच्या घरांत प्रवेश केला नि माझ्या पुस्तकांवर हल्ला केला. एक पुस्तक काढून चष्मा लावून ते वाचूं लागले.

' हिला ' त्या वेळीं बरें वाटत नव्हतें म्हणून ती बाहेर आली नाहीं. पण तिनें एकदां डोकावून पाहिलें.

आईला वाटलें, सूनबाईच्या माहेरचे कोणी तरी दिसतात. चहाला आधण ठेवून बाहेर येऊन ती त्याना म्हणाली, " सूनबाईला कालपासून जरा बरं वाटत नाहीं ! "

" असं का ? " चष्म्याच्या कोपऱ्यांतून तिरपी दृष्टी फेंकीत त्या गृहस्थानें म्हटलें नि आपलं वाचन पूर्ववत चालू ठेविलं.

माहेरच्या माणसानें आजारीपणाची अधिक चौकशी करावी, अशी आईची अपेक्षा होती. पण ह्या गृहस्थांचा घुमा स्वभाव पाहून ती उगाच राहिली.

थोड्या वेळानें सूनबाईच्या माहेरच्या माणसाला चांगला खास चहा नि दिवाळीच्या फराळांतील बरेचसे जिन्नस खाण्यासाठीं आईनें आणून ठेवलें.

" कशाला, कशाला ! " ते गृहस्थ विनयानें म्हणाले. पण लगेच त्यांनीं त्यांचा समाचारही घेतला.

तुमची मामी ( मुलांचा पुनः हंशा ) विचार करूं लागली: गृहस्थाचं चांगलं आगतस्वागत चाललं आहे, त्या अर्थी ते कोणीतरी सासूबाईच्या नात्याचे दिसतात.

आपल्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणं तिनें जास्त चौकशी केली नाहीं त्यांच्याबद्दल.

चहापान झाल्यावर आईनें त्यांना पानाची पेटी नेऊन दिली. त्यांनीं चांगलीं चार पानें एकत्र करून विडा बनविला आणि तो तोंडांत कोंबून चघळीत विचारलें, " तंबाखू नाहीं वाटतं ? "

आमच्याकडे तंबाखू कोणीच खात नसल्यामुळें आईनें चटकन् गड्याला बाहेर पाठविला. नि पांच मिनिटांच्या अवधींत सुवासिक जर्दा येऊन त्या गृहस्थाच्या तोंडांत पडला.

थोड्या वेळानें मी येऊन ठेपलों घरीं.

जेव्हां खरा प्रकार आमच्या ध्यानांत आला तेव्हां आई, मी आणि ही पोट धरून हंसूं लागलों. पण बाहेर त्यांना आमचं हास्य ऐकूं येईल म्हणून मी चूप केलं.

टुवालानें तोंड पुशीत मी बाहेर आलों. एकदां त्यांच्या चेहऱ्याकडे पाहिलं.

" झुंझारराव किती वाजतां येतील ? " मला बाहेर आलेला पाहून त्यांनीं मला विचारलें.

" मला वाटत नाहीं ते या जन्मीं येतील असं ! "

" ऑं ? म्हणजे कधीं ? " त्यांनीं आश्चर्यानें विचारलें.

" तसं नव्हे. आपले झुंझारराव या घरांत राहत नसतात ! " मी म्हटलें.

" म्हणजे ? ही बारा नंबरची खोली नव्हे "

" हो बाराच नंबरची खोली ही. "

" मग ? "

" पण ह्या बारा नंबरांत आपले झुंझारराव राहत नसून अस्मादिकांची स्वारी राहते."

गृहस्थाच्या चेहऱ्यावर फजितीचीं चिन्हें स्पष्ट दिसत होतीं.

" मला पत्ता तर दिला होता कीं आपण बारा नंबरच्या खोलींत राहतों म्हणून !" त्यांनीं सांगितलें.

" बारा नंबर खरा; पण तो कोणत्या चाळीचा? या वाडींत चार चाळी आहेत. त्या चारी बारांत ते खचीत राहात नसावे?"

" माफ करा हं!" गृहस्थ दिलगिरीच्या स्वरांत म्हणाले.

" जाऊं द्या हो! तुम्ही तरी कशाला आमच्या घरीं पायधूळ झाडणार होतां? आमचं मोठं भाग्य म्हणून आपण इथं आज आलां! आतां असं करा, ही पलीकडची चाळ दिसते ना तिथं चौकशी करा नि तिथं नाहीं सांपडले आपले झुंझारराव, तर आणखी दोन चाळींत चौकशी करा!"

" आपल्या दारावर नांवाची पाटी असती तर अशी चूक माझ्या हातून घडती ना!" कांहींशा संकोचानें आणि कांहींशा रागानें ते म्हणाले. " माफ करा हं!" आईला हात जोडून जातांजातां ते म्हणाले.

ते निघून जातांच आम्ही मुक्त पोटानें हंसलों. झोंपेपर्यंत आम्हांला दुसरा विषयच नव्हता. त्याची आठवण होऊन आम्ही सारखीं हंसत होतों. त्यामुळें माझं पोटही दुखूं लागलं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी खडू घेऊन माझ्या दारावर सुवाच्य अक्षरें कोरलीं:—

**व्ही. डी. चिंतामणी**

———

# विशाल जीवन : १०

नदींतील मासा बेचैन झाला होता. त्या चिमुकल्या जगांत त्याला स्वैर विहार करतां येत नव्हता. उथळ पाणी आणि ओसाड किनारा त्याला आवडेनाशीं झालीं. तेथील इवले इवले मासे त्याला क्षुद्र वाटूं लागले. तो मनात विचार करूं लागला, " समुद्रात जाऊन राहायला मिळेल तर किती बहार होईल ! ही भिकार नदी समुद्राला जाऊन मिळते मग मीच कां जाऊं नये ? "

तो मग हळुहळू समुद्राकडे जाणाऱ्या प्रवाहाबरोबर जाऊं लागला. खाडींतून समुद्रात प्रवेश करतांना तो आनंदानें नुसता फुलून गेला. समोरील विशाल पाणी, भव्य लाटा, अथांग खोली पाहून तो चकितच होऊन गेला. त्यानें इकडे तिकडे पाहिलें आणि पोहण्यास सुरवात केली. पण त्याच्या सभोंवार अगडबंब अशा माशांचें जाळे पसरलेलें होतें. तो भीतीनें गांगरून गेला. कोणत्या बाजूनें पुढे जावें हेंच त्याला कळेना.

समुद्रांतील त्या भव्य माशांनीं त्याला घेरलें.

तो त्यांच्याशीं झगडूं लागला.

तो सारखा झगडत होता.

झगडतां झगडतां हताश होऊन तो मनाशीं म्हणत होता, " ते माझं चिमुकलं जग किती छान होतं ! "

---

# सावत्र बहीण : ११

केशर आंत आली त्यावेळीं हेमंत नुकताच जागा झालेला तिला आढळून आला. त्यानें आळस झाडण्यासाठीं श्वास आंत ओढून घेतला अंग ताठ केलें आणि आळेपिळे देत मोठा श्वास सोडला. त्यानें डोळे उघडून पाहतांच तिनें अत्यंत मृदु स्वरानें विचारलें, "किती झोंपलां आज तुम्ही ? बरं वाटलं ना ?" आणि तिनें हळुवार हास्य केलें.

हेमंत काहीं बोलला नाहीं. परंतु त्याच्या गालातल्या गालांत हंसण्यानें केशरला तिला हवं असलेलें उत्तर मिळालें.

त्याचे खोल गेलेले डोळे तिच्या चेहऱ्यावर गुंतून राहिलेले होते. त्या डोळ्यांत कृतज्ञता आणि प्रेम यांचें प्रतिबिंब स्पष्ट दिसत होतें.

"काय, बरं वाटतं ना आतां ?" त्याच्या डोक्यावरून हळुहळू हात फिरवीत ती विचारूं लागली.

"हो," तोडांत थुंकी आल्यामुळें त्यानें तेवढेंच उत्तर दिलें. आणि पलंगाखालील तस्तांत थुंकी टाकली.

त्याला चूळ भरावयाची आहे, हें जाणून केशर घरांत गेली आणि दोन तीन मिनिटांच्या अवकाशांत लोटाभर पाणी घेऊन आली. लोटा हेमंताच्या पलंगाजवळ एका स्टुलाजवळ ठेवून पलिकडचें तस्त आणावयास ती गेली.

"कशाला हवं तें—मी बाहेरच जातों चूळ टाकायला—" हेमंत म्हणाला.

" वा, वा, तेवढी शक्ती आली नाहीं आपल्यांत अजून--" तस्त उचलून घेत केशर बोलली. आणि दुसऱ्या एका स्टुलावर तें तिनें ठेवून दिलें.

ती त्याच्या उशालगत गेली, आणि मृदु स्वरानें म्हणाली, " आतां उठा महाराज. चूळ भरा नि थोडी कॉफी घ्या—"

" हो उठतों. " हेमंतनें उत्तर केलं.

तिनें त्याच्या मानेखालीं आपल्या हाताचा आधार दिला आणि त्याच्या हाताला धरीत त्याला अगदीं हळू उठविलें.

"--नी तुम्ही बाहेर चूळ भरायला जाणार." त्याच्या अशक्तपणा-वर टीका करण्याच्या उद्देशाने ती म्हणाली.

हेमंत नुसत्या हंसण्यापलीकडे आणखी काय करणार होता ?

त्यानें चार पांच चुळा भरल्या आणि केशरनें दिलेल्या टुवालानें तोंड स्वच्छ पुसलें.

" आतां जरा टेकून रहा बरं का, तंवर मी कॉफी घेऊन येतें. हं. " आपल्या बोलण्यांत शक्य तितका कोमलपणा आणि प्रेमळपणा आणून ती म्हणाली.

हेमंत पलगाच्या एका बाजूला उशीवर रेलून राहिला. दोन महिन्याच्या आजारीपणामुळें त्याच्या मूळच्या प्रकृतींत फार फरक पडून तो आतां हिरासारखा बारीक झाला होता. तरीही त्याच्या तेजस्वी चेह-ऱ्यावरील तेज कमी झालें नव्हतें. टॉयफॉइडसारख्या भयंकर तापाच्या तडाख्यांतून तो मोठ्या नशीबानें वांचला होता. आणि त्याचें सर्व श्रेय केशर नर्सच्या पदरांत सर्वजण बांधित होतीं. तिची शुश्रुषा नसती तर आपण वांचलों नसतों, असें हेमंतला मनापासून वाटत होतें. त्यामुळें तिच्या विषयीं त्याच्या मनांत कृतज्ञता कांठोकांठ भरून राहिली होती. अलिकडे तिच्याशिवाय त्याला कांहींच करावेंसें वाटेना. अगदीं लहान सहान गोष्टी तो तिच्याकडून करून घेऊं लागला. आणि तीही त्याची सेवा करण्यांत कधींही चुकारपणा करीत नसे. दोन महिन्यांत कितीतरी जागरणें केलीं; अगदीं जवळच्या नात्याच्या माणसाप्रमाणें तिनें त्याच्या

बारीकसारीक हालचालीकडे आपलें लक्ष ठेवून त्याला लवकर आराम पडेल असे नवे नवे उपाय ती योजूं लागली. त्याला प्रत्येक गोष्टींत आनंद वाटेल असें वर्तन ती ठेवीत असे. कधीं त्याला गोष्टी, कादंबऱ्या वाचून दाखविणें कधीं कविता म्हणून दाखविणें हीं कामें ती मोठ्या तत्परतेनें करीत असे. आणि तिच्या गोड गळ्यांतून निघालेलीं गाणीं हेमंताचें मन रंजवूं शकत असत.

तिचें वागणें एकाद्या आदर्शभूत नर्सला शोभण्यासारखें होतें. रोग्याला त्याच्या कलाप्रमाणें वागून खूष ठेवण्याची कला तिला उत्तम साधली होती.

आणि आतांही ती कॉफी आणण्यासाठीं घरांत गेली त्यावेळीं तिच्याविषयींचेच विचार त्याच्या डोक्यांत पिंगा घालीत होते.

" उशीर झाला का ? " हातांत भांडी घेऊन येत असलेली केशर थोडा उशीर झाल्यामुळे हुरहुर वाटून त्याला म्हणाली. तिच्या केतकीसारख्या गौरवर्णाला पांढरेंशुभ्र पातळ आणि त्याच रंगाची चोळी खुलून दिसत होतीं.

" हो. फार उशीर झाला. " तो म्हणाला.

तो मुद्दाम थट्टेनें तसे बोलला हें तिला कळलें. पण ती म्हणाली " मग मला शिव्या दिल्या असतील— "

तिनें त्याच्या हातांत, बशींत कॉफी ओतून दिली. आणि तो पीत असतां त्याच्या चेहऱ्यावर होत असलेल्या फरकाकडे पाहात राहिली. बशी तोंडाला लागली असतां त्यानें वर डोळे करून पाहिलें, आणि ती आपल्याकडे विशेष लक्षपूर्वक पहात आहे असें पाहून त्यानें विचारिलें.

" काय, इतकं निरखून काय पाहतां माझ्याकडे ? "

प्रश्न साधाच होता. सहजच तो विचारला गेला होता. पण केशरच्या अंगावर बारीक शहारे आले. ती किंचित् दचकली सुद्धां असेल. तिनें क्षणमात्र बाजूला गोंधळून पाहिलें. आणि स्वतःला सांवरून घेऊन ती नुसती हंसली. आपल्या हंसण्यांत दुसरा कसलाही भाव दिसूं नये अशी तिनें मुद्दाम खबरदारी घेतली होती, असें तिच्या त्या निष्फळ

प्रयत्नावरून चटकन् दिसून येत होतें. कारण तिच्या हंसण्यांत लपलेली लज्जेची छटा हेमंताच्या दृष्टींतून निसटली नाहीं.

त्यामुळें कोंडलेल्या श्वासाला त्यानें नाकावाटे बाहेर सोडला आणि तोंडांतील कॉफीचा घोंट हळूहळू गिळून टाकला. तो घोंट पूर्वीच्या घोंटाहून त्याला अधिक चवदार लागला. आणि म्हणूनच कीं काय त्यानें भराभर दोन घोंट पिऊन टाकले.

" देऊं का आणखी—" केशरनें विचारलें.

" नको—" त्यानें खालच्या माननेंच उत्तर दिलें.

" घ्या ना गरम घोटभर—" असा आग्रह करून तिनें त्याच्या कपांत आणखी कॉफी ओतलीच.

हेमंतनें मुळींच हरकत न घेतां कॉफी पिऊन टाकली.

" किती बरं वाटलं मला आतां. जरा मोकळ्या हवेवर जाऊन यावंसं वाटतं " टुवालानें घाम पुशीत तो म्हणाला.

" सदरा बदलणार का ? " तिनें विचारलें.

" अं—हो, बदलावाच झालं. फारच घाम आला. " त्यानें उत्तर केलें.

सदरा बदलीत असतां त्यानें विचारिलें, " मावशी कुठं गेली ? "

" त्या देवाला गेल्या आहेत, आता येतील. "

" मी जरा बाहेर जाऊं का ? "

" अहं. "

" लांब नाहीं जात. जरा गॅलरींत खुर्चीवर जाऊन बसतों. " अगदीं काकुळतीनें तो म्हणाला. तिच्यानें त्याचा हिरमोड करवेना.

" बरं चला तर. पण वारा लागेल. आज जरा हवा थंड आहे."

तो गॅलरींत जाऊन बसला. त्याला केशरने चालण्यास मदत केली. आणि तीं दोघें बोलत तिथें राहिलीं.

बऱ्याच दिवसांनीं बाहेरची सृष्टी दृष्टीला पडल्यामुळें त्याला विलक्षण हुशारी वाटूं लागली.

" अरे, बाळ, काय हें?" देवाहून परत आलेली मावशी त्याला वाऱ्यावर बसलेला पाहून म्हणाली.

" मावशी जरा बसूं दे ग मला बाहेर, किती दिवस असा तुरुंगांत राहूं?"

त्यानें काकुळतीस येऊन विचारलेल्या प्रश्नामुळें मावशीचें हृदय कळवळलें. ती त्याच्या पाठीवरून हात फिरवित त्याला म्हणाली, " माझा बाळ तो. बैस हं. पण असं वाऱ्यावर फार वेळ राहूं नकोस. तुला नुकतंच कुठं बरं वाटूं लागलं आहे."

" मी फार वेळ कुठं बसतों आहे मावशी."

" कांहीं खाल्लंस का, बाळ ?"

" हो कॉफी घेतली आतांच."

" आत्ताच दिली मी." केशर म्हणाली.

" हं. केशर तुम्ही होतां म्हणून माझा बाळ वांचला. सख्ख्या बहिणीनें केली नसती इतकी सेवा, तुम्ही मायेनं केलीत—"

" छे. मावशी, त्यांत मी एवढं काय केलं. पोटासाठीं मी केलं. त्यांत माझी स्तुति कसली करतां?—"

हेमंत ती काय बोलते याकडे पहात होता. आणि ती बोलत असत तिचा स्वर काहींसा कंपित होत असल्याचा त्याला भास झाला.

" असं, कसं म्हणतां बाई," मावशी म्हणाली. " पोटासाठीं खरं, पण इतकं कळकळीनं कोण करायला बसलं आहे?"

" हो, बरी आठवण झाली." केशर कांहींसें आठवण झाल्यामुळें म्हणाली. " हेमंतराव आतां बरे होत चालले आहेत. माझी आतां गरज आहे असं वाटत नाहीं. मी जाईन म्हणतें आतां नी माझी आईही आजारी आहे. तिला नको का पहायला?—तिचा आजारीपणा कालपासून पुनः उचलला आहे."

" हो, का?" हेमंतनें उत्सुकतेनें विचारलें.

" हो, काल मी तिला भेटायला गेलें तेव्हां ती परत पाठवायला मुळींच कबूल नव्हती. पण कशीबशी तिची समजूत करून मी आलें.

आतां मला फार दिवस इथं राहातां येणार नाहीं नी माझी गरज तरी आहे कुठं आतां ?"

खिन्न मनानें हेमंत तिच्याकडे पहात होता. केशरनें त्याच्याकडे नजर टाकली त्यावेळीं हृदयाला कष्ट होत आहेत असें तिला आढळून आलें.

तिचें कोमल मन चलबिचल झालें.

"आपली मर्जी." मावशी उद्गारली. "तुम्ही आम्हांला जन्मभर थोड्याच पुरणार आहांत कधीं ना कधीं तरी ह्या जाणारच. पण दररोज येऊन हेमंताला एकदां तरी पहात जा."

"हो, हो. तशी मी आल्याशिवाय कशी राहीन ?"

"मग जाऊं ना मी ?" ती हेमंताकडे पहात त्याला विचारूं लागली.

मावशी घरांत निघून गेली होती. ती नाहीं असें पाहून हेमंतानें धाडस केलें.

"जाणारच का ?—जाणार ?—नका जाऊं !"

"पण आतां मी कशाला राहूं बरं ? तुम्हीं तर बरे झाला."

"छे. कुठ मी बरा झालों आहे अजून ? मला अजून बरंच नाहीं वाटत !"

केशर खुदकन् हंसली. त्यानें पुढें केलेली सबब किती फोल होती हें तिला पक्कें ठाऊक होतें. आणि तो आपल्याला सोडायला का कबूल नाहीं; हें ती जाणत असल्यामुळें तिला मनापासून हंसूं आलें होतें.

हेमंतलाही हंसूं आलें. पण त्यानें तें लपविण्याचा प्रयत्न केला.

"मग राहाणार ना तुम्हीं ? होय, राहाणार ना ?"

"नाहीं रहातां येणार मला." ती निश्चयी स्वरानें म्हणाली.

"जाणार ?—जाणार ? जा-जा—जा, आत्ताच जा. आजारी माणसाला असं अर्ध्यावर टाकून जाणार तर जा बापड्या."

"बरं नाहीं जात. रडकुंडीला नका येऊं इतकं. पण बरे कधीं होणार ते तरी सांगून ठेवा. म्हणजे मला कधीं जातां येईल तें कळेल."

" मी कधींच बरा होणार नाहीं—" तो अधीर होऊन म्हणाला.

" इश्श. भलतच काय बोलतां ? " ती म्हणाली.

" भलतंच नाहीं बोलत."

आणखी बोलणें वाढवीत गेल्यास भलताच प्रसंग ओढवेल याची जाणीव होऊन केशर हळूच तेथून निसटली.

अखेर हो ना करतां केशरनें दिवसांतून दोन वेळां हेमंतला पाहून जावें असें ठरलें. आणि त्याप्रमाणें सकाळीं संध्याकाळीं त्याची प्रकृती पाहून ती आपल्या घरी जाऊं लागली.

हेमंतचें शिक्षण बी. ए. पर्यंत झालें होतें आणि कायद्याच्या अभ्यासाला त्यानें नुकतीच सुरवात केली होती. गिरगावांत त्यांच्या वडिलांची पेढी असून जव्हेऱ्याचा धंदा बऱ्याच पिढ्या चालत आला होता. दक्षिणी लोकांत व्यापारांमध्यें ज्या कांहीं चारपांच गृहस्थांनीं लौकिक मिळविला होता त्यांत हेमंतचे वडील रामनाथ जव्हेरी यांची गणना होत असे. रामनाथ जव्हेरी चार वर्षांपूर्वी कालवश झाले होते आणि पेढीचा सर्व व्यवहार हेमंतचे मामा पहात असत. घरच्या श्रीमतीमुळें हेमंतला वाटेल तितकें शिक्षण संपादन करतां आलें; आणि एल् एल् बी. झाल्यावर पुढील शिक्षण घेण्यासाठीं विलायतला जाण्याचाही त्यानें बेत केला होता. वडिल असतांनाच त्याची आई मरण पावली आणि त्याची विधवा मावशी त्याच्याजवळ येऊन राहिली.

केशर आपल्या घरीं गेल्यावर आठ दिवस झाले होते, ती दोन वेळां त्याला पाहून जात होती खरी, परंतु इतर वेळ त्याला मुळींच चैन पडत नव्हतें.

तिनें दोन महिन्याच्या अवधींत त्याचें मन आकर्षित केलें होतें. स्वच्छ साधें पांढरें पातळ नेसलेली, पदर खोवलेली आणि पाठीवर वेणी सोडलेली तिची मूर्ति आज आठ दिवस त्याच्या डोळ्यापुढें एकसारखी नाचत होती. तिनें आपल्या मोहक स्वभावानें त्याचें मन आपल्या ठिकाणीं गुंतवून टाकलें होतें. याची जाणीव त्याला आतां व्हायला

लागली होती.

त्यामुळें सकाळीं फार उशीर झाला तरी उठून तोंड धुण्याचा त्याला विसर पडला होता आणि मावशीनें दोन वेळां येऊन हांका मारल्या तरीही उठण्याचा त्याचा बेत दिसत नव्हता.

बाहेर ऊनें बरींच पडलीं होतीं. हेमंताच्या खोलींत कांहीं किरणें पडलीं होतीं; आणि बाहेरील रहदारीमुळें ट्रॅम मोटर यांचे आवाज त्याच्या कानीं पडत होते. तो आतां उठेन, असा मनाशीं बेत करीत होता पण त्याच्या हातून तसें होत नव्हतें. केशरला कसें विचारावें? तिला काय वाटेल? नर्स म्हणून कांही दिवस शुश्रूषा करणाऱ्या मुलीबरोबर—छे-छे-! काय करावें?— आणि—ऊं हुं. त्याला पुढें काहींच सुचेना. डोकें जड झाल्यासारखें वाटलें आणि या कुशीवरून दुसऱ्या कुशीवर तो वळला.

इतक्यांत मावशीची हांक पुनः त्याच्या कानावर आली. आणि मागाहून ती त्याच्या खोलींत येऊन दाखल झाली.

" बाळा, अरे, बाळा, काय हे असं ?" एका हातानें त्याला हालवित मावशी म्हणाली. " अरे, आरंभलं आहेस तरी काय तूं आज? उशीर किती झाला बघ." बाहेरील ऊन दाखविण्यासाठीं तिनें खिडक्या साफ उघड्या केल्या.

" उठतों ग, आतां."

" चल. चल, ऊठ. चहा घे. मग बरं वाटेल."

" मामा गेले का ?"

" हो. तो गेला तुझी वाट पाहून. बरं वाटत असल्यास पेढीवर येऊन जा हवा तर, असा निरोप आहे त्याचा—चल ऊठ."

" उठतों." खरोखरच तो उठून बसला आणि सर्वांग झाडून तों तोंड धुण्यास गेला.

" मावशी, केशर नाहीं कशी आली अजून, चहा पीत असतां तो मावशीला म्हणाला. " साडे आठ तर होऊन गेले—"

" नाहीं आली असेल." मावशीनें कपांत चहा ओतला.

" तिच्या आईला आतांशा फार ताप येतो. त्यामुळं नसेल फावलं तिला आज—"

" अस्सं होय. "

" पेटीवर जाणार आहेस का ?"

" पेटीवर ? मला बरं वाटलं आहे का मावशी अजून ? मला नाहीं वाटत मी चांगला बरा झालोंसें–"

" बरं, नको जाऊंस. " मावशी म्हणाली.

"—पण आली नाहीं कशी ती अजून—!"

" कोण केशर का ! नाहीं, येईल. इतका उतावीळ कां होतोस ? आतां तिची फारशी गरज उरली आहे असंही नाहीं नी तिचे पैसेही काल देऊन टाकले हो. कालच दिले. "

" पैसे दिले ! कां दिले ? मला न विचारतां दिले ? नी किती दिले ?"

केशरला पैसे देऊन तिला मोकळी केली हें हेमंतला मुळींच आवडलं नाहीं.

" तुमचं चुकतं तें इथंच––"

" कां बाबा, त्या गरीब माणसांनीं फुकटचंच काम करावं का ? तुम्ही पैसे देईपर्यंत त्यांनीं काय हवा खाऊन राहावं ? "

" तसं नाहींग मावशी. मला कळतं म्हणजे त्यांना मी चांगलंसं बक्षीस देणार होतों." हेमंत जरा नरमाईच्या स्वरानें म्हणाला, " जिनं मला जीवदान दिलं तिचं जरा तरी उतराई नको का व्हायला ?"

" कोणी नको म्हटलं तुला ?· दे की तुला वाटेल तें बक्षीस. पण बक्षीसासाठीं तिला किती दिवस वाट पाहात ठेवायचं ! खुळा कुठला."

इतक्यांत केशरच तिथें येऊन हजर झाली.

" आजारी माणसांना कसं वाटतं ?" ती आपल्या नेहमींच्या मोकळ्या स्वभावास अनुसरून म्हणाली.

" आलांत बाई, " मावशी म्हणाली.

" तुमच्याच येण्याची वाट पाहात बसलों आहे. "

" हो, कां ? "

" जरा बाहेर फिरून ये म्हणत होतें पण नाहीं म्हणतो. "

" आतां हळूहळू फिरायला हरकत नाहीं, तशी कांहीं. " केशर उत्तरली.

" संध्याकाळीं जाईन म्हणतों बाहेर फिरायला. " हेमंत म्हणाला. " तुम्ही याल का ? सोबत असली म्हणजे जरा बरं वाटतं. " ती काय उत्तर देते याकडे तो पाहात राहिला.

आणि तिची मुद्रा गोंधळली आहे असें त्याला आढळून आलें.

" पाहीन. " इतकेंच ती उत्तरली.

" संध्याकाळीं केव्हा याल ? पांचाला आ–साडेपांचाला ठीक पडेल. नाहीं ?–इथूनच जाऊं गाडींतून. याल ना ? —"

" नक्की सांगत नाहीं. आईच्या आजारावर अवलंबून आहे सारं. तसं फारसं कांहीं नाहीं. "

" अरे, बाळ, " मावशी आठवण झाल्यासारखें करून म्हणाली. " तुझ्या त्या बक्षिसाचें काय झालं ? "

" बक्षीस का ? आतांच काय त्याचं ? हेमंत म्हणाला. "

" कसलं बक्षीस ? " केशरनें विचारलें.

" मावशी—छूत् " हेमंतनें तिला डोळे मिचकावून न सांगण्याविषयीं बजाविलें.

" त्यालाच बाई विचारा काय तें." असें म्हणून मावशी आपल्या कामाला निघून गेली आणि हेमंत आणि केशर दिवाणखान्यांत येऊन इकडील तिकडील गोष्टी बोलत बसलीं.

केशर फिरायला जाण्यासाठीं म्हणून आली ती मोठ्या आनंदांत होती. तिनें आपला नेहमींचा पोषाख बदलून अंजरी रंगाचें पातळ नेसली होती. आणि वेणी ऐवजीं तिनें साधा सैलसा आंबाडा घालून त्यांत एकच पिवळ्या गुलाबचें फूल खोवून दिलें होतें.

हेमंतकडे ती आली त्यावेळीं तो वाचीत होता. मावशी आपल्या घरांतील कामांत गुंतली होती.

ती खोलींत शिरत असतांना हेमंतचें तिकडे लक्ष जाऊन त्यानें विस्मयानें डोळे विस्तीर्ण केले. अशा सुंदर वेषभूषेमध्यें ती त्याच्या पहिल्यानेंच दृष्टीस पडली होती. आणि आज त्याच्या दृष्टीला ती विशेश मोहक भासली.

" काय चाललं आहे ?" ती हंसून म्हणाली.

" कांहीं नाहीं; वाचतों आहें."

" आलें कीं नाहीं अखेर मी ?" तिनें मोहक प्रश्न केला आणि त्याच्याकडे लोभी दृष्टीनें पाहिलें.

त्या दृष्टीनें त्याला गुदमरल्या सारखें वाटलें. त्यानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. जीभ जड झाल्यामुळें त्याला कांहीं उत्तर सुचलें नाहीं. आणि त्यानें नुसत्या स्मिता पलिकडे दुसरें काहीं केलें नाहीं.

एक दोन मिनिटें ती टेबलावरील पुस्तकें चाळीत होती. आणि कांहीं आठवण होऊन तिनें हेमंताला विचारलें, " सकाळीं कसल्या बक्षिसा-विषयीं बोलत होतां ?"

" अं हं. तें इतक्यांत सांगायचं नाहीं. "

" कां नाहीं ? पण कुणाचं बक्षीस तें तरी सांगाल ?"

" बक्षीस -बक्षीस—तुमचंच बक्षीस. "

" माझं ? नि तें कशाबद्दल ? कोणी कोणाला द्यायचं ? मी तुम्हांला कीं तुम्ही मला ?"

" मी देणार आहें. "

" मला ?"

" हो तुम्हांलाच. काल मामांनीं तुमचा हिशेब पुरा केल्याचं मला मावशीकडून कळलं, पण तुम्ही जी माझी शुश्रूषा केलीत त्याला दुसरीकडे कुठंही तोड मिळणार नाहीं. एखाद्या नात्याच्या माणसा-प्रमाणें तुम्ही माझी सेवा केलीत. केवढे उपकार झाले माझ्यावर आपले! तेव्हां या आठवणीसाठीं कांहींतरी बक्षीस द्यायचं आहे माझ्या मनांतून आपल्याला. "

" इश्श बक्षीस कशाचं यांत. "

" असं कसं. आपली फुलाची पाकळी."

" बरं. पण पाकळीवर राजी होणारी, ही केशर कांहीं इतकी अल्प-संतुष्ट नाहीं महाराज —" केशर त्याच्याकडे दृष्टि रोंखून म्हणाली. "—हो, पण हेमंतराव काय बक्षिस देणार आपण मला. जरा नांव तर कळूं द्या."

हेमंत मुकाट्यानें उठला. टेबलाच्या खणांतील एक पुडी काढून ती केशरच्या पुढें त्यानें केली.

हेमंतची इतकी जय्यत तयारी असेल असें केशरला वाटलें नव्हतें. तिनें आपला हात चटकन् मागें केला.

" काय आहे तें." ती किंचित् ओशाळल्यागत होऊन म्हणाली.

" पहा काय तें."

तिनें पुडी उघडली तेव्हां त्यांत एक पाचेची आंगठी असलेली तिला आढळून आली.

" कसं आहे माझं बक्षिस ?" हेमंत तिच्याकडे लक्षपूर्वक पहात विचारूं लागला.

तिला आनंद झाला. पण निमिषमात्रच. असमाधानाची छटा तिच्या गालांवर दिसूं लागली. तिनें ती आंगठी हेमंताच्या हातांत चटकन् ठेवून दिली. आणि म्हणाली, " हेमंतराव, मी इतकी अल्पसंतुष्ट नाहीं बरं का ?"

तो तिच्याकडे पहातच राहिला.

" माझा देणगीचा तुम्ही अव्हेर करणार का ?"

त्यानें काकुळतीस येऊन विचारलें. " मी काय देऊं, मग तुम्ही संतुष्ट व्हाल ?—"

केशरचे डोळे त्याच्या डोळ्यांशीं भिडले होते.

"—माझं हृदयच तुम्हाला देऊन टाकलं आहे—" तो आवेगानें उद्गारला. आणि तिचा हात आपल्या हातांत घेऊन त्यानें म्हटलें, " केशर आतां तरी तुझं समाधान झालं ?—"

केशर बाहेर पडली त्यावेळीं तिच्या गालांवरील तांबूस छटा कुणा-लाही दिसून आली असती.

त्या दिवशीं तीं फिरायला गेलीं नाहींत.

ती नायकिणीची मुलगी आहे, हें तिच्याच पत्रावरून जेव्हां हेमंतला कळलें, तेव्हां क्षणभर का होईना त्याचें मन कचरलें.

नायकिणीच्या मुलीबरोबर का आपण संसार थाटणार ?

मावशी, मामा आपल्याला काय म्हणतील ?–आणि समाजांत तोंड तरी वर करायला मिळेल ?

पण हे विचार त्याच्या मनांत फार वेळ टिकले नाहींत. असेना का नायकिणीची मुलगी. नायकिणीची मुलगी, हा कांहीं तिचा दोष नाहीं. त्या मुली झाल्या तरी माणसेंच आहेत कीं नाहींत ? इतर मुलींत आणि तिच्यांत काय फरक आहे ? किंबहुना केशर गुणांनीं आणि रूपानें इतरांहून जास्तच श्रेष्ठ नाहीं का ? मग तिच्याबरोबर लग्न करायला कोणती हरकत आहे ?

मावशी, मामा आणि इतर नातेवाईक यांचा राग होईल हें खरें, पण बसतील उगी काहीं दिवसांनीं. समाजही फारसं लक्ष देणार नाहीं. आणि दिलेंच लक्ष तर मी कां त्याची पर्वा करावी ? माझ्यांत तेवढी धमक आहे, मी वाटेल तें करूं शकेन. समाजानें माझा छळ केला, माझ्यावर बहिष्कार घातला तरीही चालेल. लोकांच्या इच्छेला मी कां मान वांकवावी ? त्यांच्या मर्जीसाठीं मी माझ्या सुखावर कां पाणी ओतूं ?

तें कांहीं नाहीं. मी कधींही माघार घेणार नाहीं. त्रिवार नाहीं.

असा त्यानें आपल्या मनाचा अभंग निश्चय करून टाकला आणि तसें केशरला कळविलें. तिचें मन आनंदानें भरून गेलें. आजारी आईचा आधार केव्हां नाहींसा होईल आणि आपण पोरकी होऊं याचा नेम नाहीं याची भीति तिच्या मनाला नेहमीं टोंचीत असे. जगांत आपलें कोणी नाहीं. ज्या जातींत जन्माला आलें त्या जातीचें नांव जगांत अब्रूनें दिवस काढण्यास सवड देणार नाहीं याची तिला खात्री पटली होती. आजारी आईचें आणि आपलें निर्वाहाचें साधन म्हणून थोडेसें शिक्षण झाल्यावर तिनें नर्सिंगचा कोर्स पुरा करून नर्सच्या व्यवसायाला सुरवात केली होती. आणि त्यावर त्यांचा चरितार्थ चालला होता. तिची आई

आजारीपणामुळें अगदीं मेटाकुटीस आली होती. आपल्या मागें आपल्या मुलीनें या जगांत अब्रूनें दिवस काढावे, तिला आपल्याप्रमाणें कटु अनुभव येतां कामा नयेत; फार काय शक्य असलें तर तिचें लग्नही व्हावें असें तिला वाटूं लागलें होतें. आपल्या हयातींतच या साऱ्या गोष्टी व्हाव्या अशी तिची इच्छा होती. आणि तशा तऱ्हेनें आपल्या जातींत एकादा तरुण मुलगा ती शोधीत होती.

आणि केशरनें आपल्या पसंतीप्रमाणें एका श्रीमंत तरुणाचें हृदय अंकित करून घेतलें आहे हें जेव्हां तिला समजलें तेव्हां तिनें समाधानाचा एक निःश्वास सोडला.

आश्विनाचा महिना नुकताच कुठें सुरू झाला होता. पाऊस संपून पिवळें ऊन जिकडे तिकडे पसरलें होतें. आणि त्यामुळें पावसाच्या चिरचिरीला कंटाळलेल्या जीवांना जरा मोकळेपणा वाटत होता.

केशर आणि हेमंत यांचा प्रेमसंबंध आतां साऱ्यांना ठाऊक झाला होता. मावशी आणि मामा यानीं तीव्र विरोध दाखविला पण हेमंताच्या निश्चयापुढें त्यांचें काहीं चालेना. त्याच्या मामालाही हेमंतला दुखवून भागत नव्हतें. कारण हेमंतच्या सर्व मालमत्तेची व्यवस्था ते पाहात असून तो अधिकार हातचा गमाविण्याचा मूर्खपणा करण्यास त्यांची तयारी नव्हती. तेव्हां त्यांनीं अखेर हेमंतचें मन वळत नाहीं असें पाहून "तुला वाटेल तें कर. तुम्ही अलिकडचीं पोरें आपला हेका चालविणारच." असें म्हणून वेळ मारून नेली. मावशी तर बोलून चालून मावशीच. 'आवशी पेक्षां मावशी' या म्हणीस अनुसरून हेमंतला ज्या गोष्टीनें सुख वाटत आहे, त्याला आपण तरी कशाला विरोध करा, असा विचार करून ती उगीच राहिली. त्यामुळें हेमंतला आपला निश्चय दृश्य स्वरुपांत आणण्यास बरीच मदत होत होती. त्याच मित्र या इष्ट समाज सुधारणेबद्दल त्याचें अभिनंदन करून त्याला प्रोत्साहनच देत होते.

ज्या गोष्टीचें वेड हेमंतला लागलें होतें ती गोष्ट सर्वांच्या टीकेकडे दुर्लक्ष करायला त्याला शिकवीत होती.

केशरशीं विवाह करावयाचा हा निश्चय त्यानें अगदीं दृढ करून टाकला.

त्याचें केशरच्या घरीं जाणेंयेणें वाढलें होतें. आठवड्यांतून तीन चार खेपा या सहज होत असत. आरंभीं आरंभीं केशरची आई त्याच्याशीं मनमोकळेपणानें बोले पण अलिकडे कांहीं दिवस ती आपल्याशीं पूर्वीच्या इतकी मोकळेपणानें बोलत नाहीं; ती कसल्या तरी विचारांत गढून गेली आहे, असा पुसट संशय हेमंतला येऊं लागला होता. आजारीपणामुळें तसा फरक तिच्या वृत्तींत पडला असेल असा कयास शेवटीं त्यानें आपल्या मनाशीं बांधून आपलें समाधान केले.

आतां लग्नाचें केव्हां तें ठरवून टाकावें असें हेमंताच्या उतावीळ मनाला वाटूं लागलें. केशरला आपण मोठ्या भाग्याची असें वाटत होतें. हेमंताच्या नांवाशीं आपलें नांव जोडल्यावर बांकड्या नजरेनें पाहण्याची कोणालाही छाती होणार नाहीं या विचारानें तिचें मन कितीतरी उल्हासीत झालें होतें.

हेमंत नक्की दिवस ठरविण्याच्या इराद्यानें आज केशरच्या घरीं आला होता.

केशरच्या आईपुढें हा प्रश्न त्यानें टाकला.

" आई, " तो तिला उद्देशून बोलूं लागला.

आणि आपल्या दोन अक्षरांनीं तिच्या मुद्रेवर जें आश्चर्य हेमंतला आढळून आलें त्यानें तो अगदीं बुचकळ्यांतच पडला. आपण पुढें काय बोलणार हें ऐकण्यासाठीं तिची उत्सुकता वाढली असावी, असा विचार मनांत येऊन हेमंत हंसून म्हणाला, " केशरला आतां कधीं न्यायला येऊं तें विचारायला मी आलों आहे."

नैसर्गिक लाज आल्यामुळें त्याची मान खालीं गेली होती. नाहींतर केशरच्या आईच्या चेहऱ्यावरील विविधविकारांचें मिश्रण हेमंतला सहज दिसून आलें असतें.

तिची मुद्रा अगदीं चमत्कारिक झाली होती. मनांत कांहींतरी बोलावयाचें असतें, पण बोलूं न बोलूं अशी जी एक गोंधळलेली स्थिति

माणसाच्या मनांत उत्पन्न होऊन चेहऱ्यावर त्याचें प्रतिबिंब दिसतें, तसाच प्रकार तिचा होऊन ती घुटमळत होती. पण अखेर कांहीं ठाम निश्चय करून ती कपाळाला आंठी घालून म्हणाली, " हेमंतराव केशरशीं तुमचं लग्न होणें शक्य नाहीं. कारण—"

पण तिनें आपलें वाक्य पुरें केलेंच नाहीं.

केशरचा चेहरा फटफटीत पडला. आणि हेमंत तर नुसत्या आश्चर्यातिरेकानें आळीपाळीनें दोघांच्याही तोंडाकडे पहात राहिला.

" कारण नाहीं सांगितलेंत–" कांहींशा करारी स्वरानें तो बोलला.

ती काय बोलते यांकडे केशरचें लक्ष लागलें होतें. हेमंत विचार करीत होता. इतके दिवस आपला प्रेमसबंध हिला ठाऊक असतां आणि त्याला आपली मूकसंमति दर्शवूनही ही आयत्या वेळीं हें असें काय करीत आहे, या कोड्याचा उलगडा तो आपल्या मनापाशीं करीत होता.

बराच वेळपर्यंत ती कांहीं बोलली नाहीं. कांहीं तरी नक्की विचार ती करीत होती. नाकाजवळ बोट नेऊन अगदीं असेंच करावयाचें असा निश्चय करून ती आपल्या खोलींत गेली आणि दोन मिनिटांच्या अवधींत एक तसबीर घेऊन बाहेर आली.

" हेमंतराव, हा फोटो कुणाचा ? " तिनें विचारलें.

" हा ! " आश्चर्य वाटून त्यानें उलट प्रश्न केला, " हा माझ्या वडिलांचा, आपल्याकडे कसा आला ? "

" कसा आला ?—आपले वडिल माझे यजमान होते. "

मस्तकावर वीज पडावी तसें त्याला झालें.

" आणि ही केशर त्यांचीच मुलगी आणि तुझी बहीण—"

केशरचा गळा विस्मयानें सुकून गेला. आणि तिचें सर्वांग घामानें चिंब होऊन गेलें.

" रामनाथचे—" केशरची आई बोलूं लागली. " आपण चिरंजीव, हें मला कळून आलें. तेव्हां माझ्या मनाला धक्का बसला. माझ्या लाडक्या केशरच्या प्रेमाचा भंग होणार, हें कळून मी अगदीं अस्वस्थ झालें. तुम्हांला सावध करावं असं पुष्कळ आलं मनांत. पण स्वार्थ माझ्या

इच्छेआड आला. गुप्त गोष्ट न फोडतां केशरला आपल्या पत्नीपदाचा मान मिळवून द्यावा, असं माझं स्वार्थी मन मला शिकवूं लागलं—आणि त्या स्वार्थाला मी बळी पडले. विवाह घडवून आणण्याच्या पापाला मी तयार झाले. पण हेमंत, माझं मन मला खाऊं लागलं. ज्या एकनिष्ठेनें मी आपल्या वडिलांशीं दारिद्र्य स्वीकारलं. आपल्या वडिलांचं व्यसन गुप्त राखलं. त्यांच्यावर प्रेम करून आजवर दिवस काढले—" तिच्या डोळ्यांत अश्रूंची दाटी होऊन गळाही भरून आला, त्यामुळें एक क्षण ती उगी राहिली.

"त्यांच्या मृत्युची खबर ज्या वेळीं मला कळली त्यावेळीं माझी काय स्थिति झाली ती एका देवाला ठाऊक. त्या दिवसापासून मी अंथरुण धरलं ती आजवर आजारांत पडून आहे. माझ्या मनांत असतं तर मला वाटेल तितका पैसा मिळवितां आला असता, आपल्या वडिलां-कडून. पण मी तशीं वागले नाहीं. ते होते तोंपर्यंत मला पैशांचें पाठ-बळ होतं पण—" तिला पुन: हुंदका आला. पण त्यांना दिलेल्या वचना-प्रमाणें मी आजवर वागून या स्थितींत राहिलें. मला आपणाला पाहून मोह उत्पन्न झाला. केशरला चांगला पती मिळाला. ती तरी आतां सुखांत राहील या विचारानें मी आनंदीत झाले पण देवाला तें सुख पहा-वलं नाहीं. तुम्ही कोण हें मला समजलं, अगदीं उशिरां समजलं. आरंभीं समजत तर कांहीं तरी सूचना केली असती—आणि मी पापी विचाराच्या बळी पडलें. पण अखेर सत्य बाहेर आलंच. मला तो विचार सहन होईना. आपल्या वडिलांच्या आत्म्याला काय वाटेल ? ते काय म्हण-तील ? त्यांना हें आवडणार नाहीं—असे विचार मनांत येऊन मी तें गुप्त रहस्य फोडीत आहे—केशरशीं तुमचं लग्न होणं अशक्य आहे- ती तुमची बहीण आहे—"

केशर आईच्या गळ्यांत येऊन पडली. तिच्या गुदमरलेल्या हुंदक्यांना बाहेर येण्यास वाव मिळेना.

हेमंत दगडासारखा निश्चळ उभा होता. आपली अचळ दृष्टी

काढून त्यानें केशरवरून फिरविली. वडिलांच्या तसबिरीकडेही त्याची नजर गेली. पण त्या नजरेंत पूर्ण तिरस्कार भरलेला होता.

त्यानें पुन: एकवार केशरकडे पाहिलें आणि आपली खालीं पड-लेली टोपी तशीच विसरून तो दरवाजातून बाहेर पडून दादर उतरूं लागला.

पायऱ्यांवर होणारा त्याच्या पावलांचा आवाज केशरच्या कानांवर आदळत होता त्यानें जणूं तिच्या हृदयावर वज्रप्रहारच झाल्यासारख्या तिला वेदना होत होत्या.

---

# अभिमान : १२

एक लंगडा ट्रॅममधें चढण्याचा प्रयत्न करीत होता. ट्रॅमचा ड्रायव्हर त्याच्याकडे पहात होता. केव्हां एकदां ही ब्यॅद वर चढते आणि आपण गाडी सुरू करतों असें त्याला होऊन गेलें होतें असें दिसत होतें.

आणि तो लंगडा वर चढतांच त्यानें गाडी वेगानें चालू केली.

माझें सारें लक्ष त्या लंगड्याच्या हालचालीकडे लागून राहिलें होतें.

हातांनींच सरपटत तो आंत आला. त्यानें आपली उदास दृष्टी चोंहोकडे फिरविली. आणि माझ्या समोरच्या बांकावर त्यानें आपलें आसन स्थिर केलें. बांकावर बसतांना त्यानें खालून अशी सहज गतीनें वर उडी मारली कीं कुणालाही वाटावें त्याच्या नेहमीच्याच सरावांतील ती गोष्ट होती.

मी त्याच्याकडे पहात होतों.

दोन्ही पायांतून तो कायमचा लुळा झाला होता. त्याचे हातच आतां त्याला पायांच्या ठिकाणीं होते. त्याच्या अंगावर घामट, मळकीं लक्तरें होतीं. चेहरा अत्यंत उदास. आपल्या भवितव्याबद्दल निराशेची खात्री वाटणाऱ्या माणसाचा जसा चेहरा असतो तसाच त्याचा होता. मात्र डोळ्यांत उदासीनतेबरोबरच आणखी कशाची तरी विलक्षण आकर्षक झांक असल्याचा भास होत होता.

आणि त्याच्याकडे माझें लक्षसर्वस्व लागण्याचें कारण तरी तेंच होतें.

थोड्या वेळानें ट्रॅमचा कंडक्टर आला. तो येण्यापूर्वींच लंगड्यानें आपल्या खिशांची झडती घेण्यास सुरवात केली होती.

मी मनांत विचार करीत होतों. लंगड्यांपासूनही ट्रॅम कंपनी पैसे घेते? नाहीं तरी ती समानतेचें पालनच करते. तिच्याजवळ गरीब आणि श्रीमंत, दुर्बल आणि सबल हा भेद नाहीं. सूर्याचा प्रकाश नाहीं का दोघांनाही मिळत? ट्रॅम कंपनी निसर्गाचेंच अनुकरण करीत आहे जसें!

मला त्याची दया आली. भूतदयेनें प्रेरित होऊन मी खिशांत हात घातला आणि एक आणा पुढें केला.

" हा घे त्याचा आणा ! " मी म्हटलें.

" साहेब, अशी गोष्ट होणार नाहीं. हे घ्या माझे पैसे ! " त्यानें मला पैसे देण्याची संधि लाभूं दिली नाहीं. आपल्या खिशांतील एक आणा काढून त्यानें कंडक्टरच्या हातावर ठेवला.

त्याच्या डोळ्यांत यावेळीं एक निराळीच चमक दिसत होती. मला ती लोभनीय वाटली. कंडक्टर निघून गेल्यावर मी त्याला विचारलें.

" कायरे, तुला पैसे जास्त झालेत वाटतं? मला कां देऊं दिले नाहींस? "

" साहेब, तुमचे पैसे मी कां म्हणून घेऊं? मीही धंदेवाला आहें. मीही पैसे मिळवतों ! "

मी चमकून विचारलें " तूं? "

" होय, साहेब ! "

" तूं कोणता धंदा करतोस? "

" भिक्षा मागतों मी महालक्ष्मीच्या देवळांत, साहेब ! " त्यानें अभिमानपूर्वक उत्तर दिलें. यावेळीं त्याचे डोळे विलक्षण तेजानें चमकत होते.

---

# रिकामें मन : १३

रोजच्या रोज शेंकडों माणसें तुरुंगांत जात होतीं. शिरोड्याच्या सत्याग्रहाश्रमात लोकांची सारखी रीघ चालू होती. चोंहीकडे देश-प्रेमाचा उत्साह भरून राहिला होता. कायदेभंगाची चळवळ जोरात चालू होती; तरी त्याचा परिणाम माझ्या मनावर मात्र कांहींच झालेला नव्हता. काम नाहीं, धंदा नाहीं. खुशाल दोन्हीं वेळां जेवावें, नाटकें कादंबऱ्या वाचाव्या, मीनाक्षीशीं गप्पा गोष्टी कराव्या, छोट्या अविनाशला खेळ-वावें हाच माझा रोजचा कार्यक्रम होता. वर्तमानपत्रें वाचून माझ्या अंत:करणांत देशप्रेमाची ज्योत पेटली नाहीं. वास्तविक माझ्यासारख्या खुशालचेंडू प्राण्याला कोणत्याही प्रकारची काळजी नव्हती. घरांत सर्व-प्रकारच्या सुखसोयी होत्या. मागची काळजी करण्याचें कारण नव्हतें; तरीही चळवळींत काहीं मी पडलों नाहीं.

पण त्या दिवशीं मात्र मी अगदीं निराळा मनुष्य बनलों. संध्या-काळचा वेळ होता; मीना कुठेंतरी बाहेर गेली होती अविनाशला घेऊन. माझ्याहीजवळ एकादें चांगलेसें पुस्तक नव्हतें वाचायला, म्हणून मी जरासा अस्वस्थ झालों होतों. मी इकडून तिकडे येरझारा घालीत फिरत होतों ओट्यावर. इतक्यांत दारासमोरून सत्याग्रहींची एक तुकडी 'वंदे मातरम्' 'महात्मा गांधी की जय' असें ओरडत गेली.

माझ्या विचारांना नवी चालना मिळाली. मी मनांत विचार करूं लागलों आपणही यांच्यांत सामील झालों तर !

मला ती कल्पना अतीशय गमतीची वाटली. एका ठराविक परिस्थितींत नेहमीं वावरणारें माझें मन ही कल्पना येतांच मोहून गेलें. कोणताही विचार न करता मी मिठाचा सत्याग्रह करायचें ठरविलें.

" एकस्या एकस्यानं इतकं आनंदायला काय झालं ? " अविनाशला घेऊन आलेल्या मीनाक्षीनें विचारलें.

" माझ्या कंटाळलेल्या मनाला एक नवी करमणूक मिळाली आहे. पण इतक्यात तिची परिस्फुटता करायची नाहीं. उद्या सांगेन — कशाला दिसेलच काय ते उद्या तुला ! "

तिच्या उत्तराची अपेक्षा न करतां मी लगेच डोक्यावर टोपी टाकून बाहेर निघालों. आणि सत्याग्रह आश्रमाच्या कचेरींत जाऊन नाव नोंदविलें.

दुसरे दिवशीं सकाळीं सत्त्याग्रहाला निघणाऱ्या तुकडींत मला पाहून गावकऱ्यांनीं आश्चर्यानें तोंडांत बोटें घातलीं असल्यास नवल नाहीं. मीठ तयार करताना आम्हाला पकडलें. आणि आमची त्याच दिवशीं रत्नागिरीच्या तुरुंगात रवानगी झाली. जातांना मीनाक्षी आणि अविनाश यांच्या डोळ्यातील अश्रूंनीं आणि चेहऱ्यावरील कारुण्यानें माझें मन चलबिचल झालें, तरीही एका नव्या वातावरणात पडल्याचा आनंद माझ्या मनाला सुखवीत होता. रत्नागिरीहून आमची येरवड्याच्या तुरुंगात रवानगी झाली.

येरवड्याच्या तुरुंगात भिंतीला डोकें टेकून बसलो असतां हे विचार माझ्या डोक्यात येत होते. गंमत म्हणून केलेला सत्याग्रह किती तापदायक असतो याची प्रचीति माझ्या अनुभवाला साडेतीन महिन्याच्या अनुभवानें आली होती. तुरुंगाची कोठडी म्हणजे कड्या लावून वाचीत बसायची खोली नव्हे याचा मला अनुभव आला.

नाहीं म्हणायला बळिराम माझ्या सोबतीला होता. हें त्यांतल्या त्यांत एक समाधान होतें. दरोडा घालणें आणि खुनाचा प्रयत्न करणें या आरोपान्वयें त्याला सात वर्षांची सजा झाली होती. शिक्षेचीं बहुतेक वर्षें त्यानें घालविलीं होतीं. मी तुरुंगात आलों तेव्हां बळिराम म्हणजे एक मौनीबुवाच होऊन राहिले होते. त्याच्या पूर्वीचे सोबती शिक्षा

भोगून त्याला सोडून गेले होते आणि एकाकी आयुष्य घालवूं लागल्या मुळें तो उदास झाला होता.

मी आलों त्यावेळीं तो कोणाशीं फारसा बोलतही नसे. त्याच्या निरुपद्रवी वागणुकीमुळें वॉर्डरही त्याच्या वाट्याला फारसा जात नसे. सविनय कायदेभंगाच्या चळवळीनें रिकामे तुरुंग भरभर भरूं लागल्या-मुळें त्याच्या चेहऱ्यावर आश्चर्य दिसूं लागलें.

त्यानें एके दिवशीं मला हळूच विचारलें, " साहेब आपण कोणता गुन्हा केला होता ? बँकेच्या पैशांची अफरातफर केली कीं खोटा चेक वटावला ? "

मी नुसता हंसलों.

" आणि हे रोज रोज कोण येत असतात? मोठा दरवडा तर नाहीं पडला ? " त्यानें पुनः विचारलें.

मी पुनः एकदा हंसलों.

" तूं गांधींचं नांव कधीं ऐकलं आहेस का ? "

" गांधी ! यांनीं कुठं दरवडा घातला हा ? "

" दरवडा नाहीं. ते आमचे पुढारी आहेत. हिंदुस्थानला स्वतंत्र करण्यासाठीं ब्रिटिश सरकारविरुद्ध कोणताही अत्याचार न करतां ते लोकांना लढायला सांगत असतात. "

मी त्याला चळवळीची थोडक्यांत माहिती करून दिली. तेव्हां कुठें मी कोणी चोर, लुटारू, दरवडेखोर नाहीं याची त्याला खात्री पटली.

आणि तो माझ्याकडे विशेष आदरबुद्धीनें पाहूं लागला. त्या दिवसापासून बळिराम माझा दोस्त बनला. तुरुंगांत कोणत्याही प्रकारें मला त्रास होऊं नये म्हणून तो जपूं लागला.

मीनाक्षी मला दोन वेळां भेटायला आली तेव्हां तिच्या डोळ्यांतील अश्रू पाहून तो गहिंवरून गेला. अविनाशला पाहून त्याचें मन भरून आलें. त्याला घेण्यासाठीं त्यानें दुरून हात पुढें केला पण अविनाशनें घाबरून आपलें तोंड फिरविलें.

मीनाक्षीचें पत्र आलें कीं तो आनंदांत असायचा.

मी त्याला एकदां विचारलें,

" बळिराम, तुझी बायकामुलं तुला पत्र नाहीं का पाठवीत ? तुला भेटावेसं नाहीं वाटत त्यांना ? "

त्याचे डोळे ओलावले.

निरभ्र आकाशांत मधेंच एखादा मेघ येऊन टपटप थेंब गळावे त्याप्रमाणें त्याच्या डोळ्यांतून आसवें गळूं लागलीं.

" तिच्यासाठींच तर दरवडा घातला. मुलगी आणि बायको यांना दारिद्र्यांत दिवस काढावे लागूं नयेत म्हणून चोरी करण्याची संवय लागली आणि त्या नादाला बळी पडून आज इथ सात वर्षें खडी फोडण्याचा प्रसंग आला. "

" तुझी चौकशी नाहीं करीत कधीं ?

" चौकशी कुठली आली आतां, ती आपल्या नव्या दादल्यासह मजेंत संसार करीत असेल—"

" म्हणजे ? तुला कसं कळलं ? "

" वाईट वार्ता कशा आपसूक कळत असतात ! "

" मग आतां घरीं कोणी असेल तुझ्या ! जाणार कुठं तूं सुटका झाल्यावर ? "

" कुठं जाणार मी, कुठं जाणार ? " तो स्वत:शींच पुटपुटला, " इथंच येईन पुन्हां हेंच माझं घर आतां ! "

" बळिराम, तूं माझ्या घरीं येईनास ! "

त्यानें मान वळवून माझ्याकडे पाहिलें आणि विचारलें, " तुमच्या घरीं ? एका दरवडेखोराला तुम्ही घरांत आश्रय देणार ? "

" तूं आतां कुठें दरवडेखोर राहिला आहेस, बळी ? आतां तूं पुरा पालटला आहेस. तुझ्यांत नि माझ्यांत फरक नाहीं फारसा ! "

" साहेब, तुम्ही किती चांगले आहांत ! "

हीं चित्रेंही माझ्या डोळ्यांसमोरून येऊन गेलीं.

इतक्यांत बळीराम माझ्याजवळ येऊन म्हणाला, " साहेब, द्या टाळी ! कसला विचार करीत बसला आहांत ? "

मी मान वर करून त्याच्याकडे पाहिलें. माझ्या दृष्टींतील प्रश्न त्याला समजला. तो म्हणाला, "उद्यां आपण दोघेहीं सुटतों आहोंत !"

मी प्रश्नार्थक मुद्रेनें त्याच्याकडे पाहिलें.

"आपली चार महिन्यांची शिक्षा उद्यांच संपते–सूट मिळाली आपल्याला आणि सुदैवानं माझीही सुटका उद्यांच होते !"

ती रात्र आम्ही दोघानींही बोलण्यात घालविली. आमच्याबरोबर आणखी कांहीं सत्याग्रही सुटणार होते. तही आमच्या आनंदात सामील झाले हते.

दुसरे दिवशीं तरुंगाच्या दारांतून आम्ही बाहेर पडलो. त्यावेळीं एकाद्या नव्या जगात यऊन पडल्यासारख वाटले मला. मला इतकें वाटले तर बिचाऱ्या बळिरामाला काय वाटलें असेल ! त्यान तर जवळ जवळ सात वर्षं काढलीं होतीं त्या अंधारकोठडींत. सात वर्षांत तुरुंग हेंच त्याचें जग होतें. त्यामुळें बाहेर येताच त्याची दृष्टी भांबावून गेल्यास नवल नाहीं.

मुंबईचा राणीचा बाग पहाणाऱ्या नवख्या इसमासारखी त्याची स्थिति झाली.

आणि आम्ही शिरोड्याला घरीं येऊन दाखल झालों, तेव्हां ओळखीच्या मीनाक्षीला पाहून त्याचें आश्चर्य बरेंचसे ओसरलें.

शिक्षेत सूट मिळाल्यामुळें आमची लवकर सुटका झाली. नाहीं-तर मीनाक्षी पण न्यायला येणार होती. मला अनपेक्षित आलेला पाहून तिला आश्चर्य वाटलें तसाच अतिशय आनंदही वाटला.

परंतु बळिरामासारख्या भयंकर माणसाला घरीं आणलेलें कांहीं तिला आवडले नाहीं. मी कशीबशी तिची समजूत केली.

बळिराम दीड वर्षांच्या अवधींत आमच्या घरांतलाच एक होऊन गेला. मीनाक्षीचा त्याच्या विरुद्ध असलेला ग्रह दूर झाला होता. आणि अविनाशही त्याच्याशिवाय क्षणभर राहीनासा झाला. मी त्याच्यावर घरची बहुतेक सारी व्यवस्था सोंपविली होती. सर्व व्यवस्था तोच पहात असल्यामुळें मला सार्वजनिक कामांत थोडथोडा भाग घेण्यास मिळूं

लागला होता. शहरकाँग्रेसकमिटीमध्यें मी एक प्रमुख कार्यकर्ता होतों. काँग्रेसच्या चळवळींत भाग घेऊं लागल्यामुळें माझ्या नांवाचा बोलबाला चोहींकडे होऊं लागला. स्थानिक आणि प्रांतिक पुढाऱ्यांत माझी गणना होऊं लागली.

बळिरामाच्या जीवनप्रवाहाला मी इष्ट वळण लावल्यामुळें मला त्याच्याविषयीं आणि त्याला माझ्या विषयीं अभिमान वाटूं लागला.

त्यानंतर कामाच्या दगदगीमुळें माझी प्रकृति थोडी बिघडली होती. डॉक्टरच्या सल्ल्यावरून मी आंबोलीला हवा बदलायला जाण्याचें ठरविलें. आणि सर्व मंडळींसह आंबोलीला गेलों. घरची व्यवस्था पाहाण्यासाठीं बळिरामाला ठेऊन दिला. माझ्याबरोबर येण्याची त्याची फार इच्छा होती, अविनाशचा वियोग होणार म्हणून त्याला वाईट वाटत होतें पण घरीं कोणीतरी विश्वासू मनुष्य पाहिजे म्हणून मोठ्या नाइलाजानें त्याला घरीं ठेवणें मला भाग पडलें.

आंबोलीच्या घाटावर तीन महिने थंड हवेंत काढून आम्ही घरीं परत आलों. आलों तों ऐकिलेल्या बातमीनें मला धक्काच बसला.

दोन दिवसांपूर्वी बळीराम माझ्या घरातून पळून गेला. त्याच्या नाहींसें होण्यानें मला आश्चर्य वाटलें. संशय वाटून मी घरांतील सर्व चीजवस्त तपासून पाहिली. सर्व अगदीं जागच्या जागीं होतें.

मग बळिराम कुठें गेला? मला काहीं तें कोडें उलगडेना.

संध्याकाळीं पोलिसचौकीवरून मला बोलावणें आल म्हणून मी गेलों तेथें हातांत बेड्या घातलेला बळिराम माझ्या दृष्टीस पडला.

फौजदारांनीं एका पोलिस शिपायाला कांहींसें आणायला सांगितलें.

शिपायी एक चांदीचें ताट घेऊन आला.

"हें ताट आपलंच काय?" फौजदारानें मला विचारलें.

मी तें ओळखलें. अविनाशसाठीं मी मुद्दाम तें खरेदी केलेलें होतें.

"होय माझंच हें ताट!" मी उत्तरलों. आणि बळीरामाकडे सहेतुक दृष्टीनें पाहिलें. त्याची दृष्टी माझ्याकडेच होती. नजरेला

नजर भिडतांच त्यानें आपली नजर शरमेनें खालीं वळविली. मी सर्व स्थिति थोडक्यांत समजलों. बळीरामानेंच तें नेलें होतें.

बळीरामानें चोरी कां केली? त्याला कोणत्या गोष्टीची उणीव होती?

" याच्यावर आम्ही चोरीचा आरोप ठेवणार आहोंत. आपण चोरीची तक्रार नोंदवा—" फौजदाराचें वाक्य पुरें होण्याच्या अगोदर मी उत्तरलों, " आपला गैरसमज होतो आहे, फौजदार साहेब, बळिरामानं चोरी केलेली नाहीं. आंबोलीला जाण्यापूर्वी हें ताट मी त्यालाच दिलेलं होतं बक्षिस म्हणून." फौजदारांचा नाइलाज झाला. मोठ्या नाखुषीनें त्यांनीं बळीरामाच्या हातकड्या काढल्या.

तें चांदीचें ताट घेऊन मी पोलिसचौकींतून बाहेर पडलों.

मंत्रबद्ध सर्प गारुड्याच्या मागून मुकाट्यानें चालावा, तसा बळिराम माझ्या मागोमाग येऊं लागला.

वाटेंत आम्ही बोललों नाहीं.

मी विचार करीत होतों—बळिरामानें चोरी कां करावी? आणि तीही एका चांदीच्या ताटाचीच. घरांत इतक्या भारी किंमतीच्या वस्तू होत्या पण त्यांना हात न लावतां अविनाशच्या चांदीच्या ताटावरच त्याची दृष्टी कां जावी?

मला हें कोडें उलगडेना.

घरीं आल्याबरोबर दारांत उभ्या असलेल्या मीनाक्षीच्या हातांत ताट देऊन मी खुर्चीवर अंग टाकलें.

बळिराम खालीं मान घालून खांबाला टेकून उभा होता.

मीनाक्षी गोंधळून त्याच्याकडे पहात होती. तिला कांहींच उलगडा होत नव्हता. अविनाश बळिरामाकडे जाण्यासाठीं चुळबुळ करीत होता. मी उद्वेगानें विचारलें " बळिराम, ही दुर्बुद्धी तुला कां आठवली? तुला असं इथें काय कमी होतं कीं तुला चोरी करण्याची जरुरी भासावी?"

" साहेब!" गहिंवरलेल्या शब्दांत बळिराम म्हणाला.

" मी चोरी केली ? होय चोरी केली. कां केली ? हं तेंच तर मला कळत नाहीं, कां बरं मी चोरी केली ? तुम्ही गेलां, मला अगदीं खायला यायला लागलं हें घर, चैन पडेना. अविनाशसाठीं जीव तळमळूं लागला. दिवस कंटाळवाणे जाऊं लागले आणि जुनी संवय जागृत झाली. साहेब, माफ करा; चोरी करावी असं वाटूं लागलं. त्या कैफांत मी आपले उपकार विसरलों. "

" अरे, मग चोरी करायची ती सामान्य कां ? अविनाशचं चांदीचं ताट कां चोरावंस ? इतर दागदागिने नव्हते कां घरांत ? "

" हं ! " थोडासा विषण्णपणें हंसून बळीराम म्हणाला, " होय असली क्षुल्लक चोरी कां केली मी ? अविसाठी–अविसाठीं. अविनाशची आठवण कायमची राहण्यासाठीं त्याचं ताट मी चोरलं ! "

त्यानें आपल्या दोन थोबाडांत मारून घेतल्या.

---

# उपकारी माणसें : १४

महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत आम्हां कारकून लोकांची काय परिस्थिति असते हें तुम्हांला सांगायला पाहिजेच असे नाहीं. मीही त्याला अपवाद नसल्यामुळें ऑफिसांतून सुटल्याबरोबर विचार करूं लागलों, आतां घरापर्यंत पायींच का प्रवास करायचा ? एक, दोन, तीन, चार आणि एक पांच. पहिली तारीख उजाडायला अजून चार दिवसांचा अवकाश होता. आणि आज खिशांत तर नाहीं एक आणा.

आठ तास काम करून दीड दोन मैल पायपीट करण्याची इच्छाही नव्हती पायांना.

ऑफिसांतून बाहेर पडल्यावर असा विचार करीत कोटांतल्या फाऊंटनजवळ येऊन पोंचलों.

मी समोर पाहिलें तेव्हां मुंबई हायकोर्टाच्या बाजूनें माझा मित्र श्रीपाद हळूहळू येत होता.

त्याला पाहतांच मला आनंद झाला. मी मनांत म्हटलें, साखरेचें खाणारा त्याला देव देणारा; आतां सोय झाली आपली. चालत जाण्याची कटकट वांचली. श्रीपादचीच पाठ धरावी आतां.

इतक्यांत श्रीपाद माझ्याजवळ येऊन पोंचला होता.

" बरं झालं भेटलास तो !" मी म्हटलं. " खरंच बरं झालं भेटलास तो !" श्रीपादनें उलट उत्तर दिलें. त्यानें दिलेली सिगरेट तोंडांत कोंबीत मी मनांत म्हटलें, स्वारीचा खिसा अजूनही बराच गरम दिसतोय.

आणि आम्ही इकडल्या तिकडल्या गप्पा मारीत आणि आपापल्या ऑफिसांतील मिजासखोर साहेबाना सडकून शिव्या देत आठ नंबरच्या ट्रॅममध्यें केव्हां येऊन बसलों हें आमचें आम्हासच कळलें नाहीं.

आणि कंडक्टरनें जेव्हां येऊन विचारलें, " तिकीट प्लिज ! " तेव्हां आम्ही चमकून त्याच्या तोंडाकडे पाहिलें. आणि त्यानंतर मी श्रीपादच्या आणि श्रीपादनें माझ्या तोंडाकडे एकाच वेळीं पाहिलें.

श्रीपाद कांहीं बोलला नाहीं तेव्हा मीच उत्तरलों, " अच्छा दो ऑपेरा हाऊस ! "

" अच्छा ! " तिकीट कंडक्टरनें उत्तर दिलें. आणि त्यानें दोन तिकीटें फाडून आपल्या चिमट्यात धरून नंबरावर खुणा करून माझ्या हातांत दिलीं.

त्यानें पुढें केलेला हात कांहीं क्षण तसाच राहिलेला पाहून मी श्रीपादकडे पाहिलें.

तो या वेळीं खिडकींतून बाहेरची शोभा पाहाण्यांत गढून गेला होता. सायंकाळचा प्रसन्न समय. मग त्यावेळीं सृष्टीशोभा अवलोकन करायची नाहीं तर कधीं करायची?

मी त्याला हळूंच चिमटा घेतला. त्यानें माझ्याकडे पाहिलें.

मी म्हटलें, " पैसे दे ना ! "

" सॉरी. आज तूंच दे. एक आणा असेल तर शपथ ! " त्यानें उत्तर दिलें.

माझ्या छातींत धस्स झालें.

पण सांवरून घेऊन मी कंडक्टरला म्हटलें, " हें पहा, आम्ही पैसे आणायला विसरलों. विसरलों कसचे घाईच झाली म्हणाना, तेव्हां असं करा या तिकीटांना दुसरं गिऱ्हाईक पहा, आम्ही इथं उतरतों. एक्स्क्युज हं !"

कंडक्टर हंसत होता. त्याच्या त्या भरदार काळ्या मिशांत तें हास्य विशेष शोभून दिसत होतें.

" ठीक आहे ! पण तुम्हाला जायची जरूरी नाहीं. तिकिटं राहूं द्या तुमच्याचकडे पुनः केव्हांतरी भेटलां म्हणजे पैसे द्या झालं.

आपल्यासारख्या अंमलदारांना असं परत पाठवायचं शोभत नाहीं मला !" त्यानें उत्तर दिलें.

अंमलदार ? कसले बोडक्याचे अंमलदार ! रोज साहेबांच्या शिव्या खातांना गेलीं इतकीं वर्षे आणि म्हणे अंमलदार, असे माझ्या मनांत विचार आले. तरीही त्याच्या त्या संबोधनानें थोडें अंगावर मूठभर मांसही चढलें.

मी श्रीपादकडे वळून पाहिलें. तो आपली टॉय व्यवस्थित करीत होता.

"वा, वा! छान! इन्स्पेक्टर साहेब, तुमच्यासारखीं थोर माणसं क्वचितच सांपडतील!" कंडक्टरला खूष करण्यासाठीं मी त्याला इन्स्पेक्टर पदवी अर्पण केली.

"साहेब, इन्स्पेक्टर व्हायला अजून मला अवकाश आहे!" त्यानें परत उत्तर केलें.

आणि तो पुढें आपल्या कामाला निघून गेला.

इतक्या माणसांच्यासमोर होणारी शोभा टळली म्हणून आम्हांला आनंद वाटला.

तो गेल्यावर मी श्रीपादला म्हटलें. "कायरे, एवढ्या थाटांत सिगारेट ओढीत चालला होतास तेव्हां वाटलं तुझ्याबरोबर यायला कांहीं हरकत नाहीं."

"खरं सांगायचं म्हणजे मी पायींच जाणार होतों आज घरीं. अचानक तूं दिसलास, म्हटलं बरं झालं पायीं जाण्याचं टळलं. मला काय ठाऊक तूं असा—माझ्यासारखाच असशील तें!"

"एकूण काय एकादशीच्या घरीं शिवरात्री आली म्हणायची." मी उत्तर दिलें. आणि त्यालाही सांगितलें कीं तुझ्या भरंवशावर मी हा प्रवास आरंभला होता.

आम्ही दोघे या घटनेनें कांहीं वेळ तोंड दाबून हंसत होतो.

नंतर आम्हीं दोघांनीं ठरविलं कीं ज्याला कंडक्टर पुनः भेटेल त्यानें त्याचे दोन आणे देऊन टाकायचे.

पहिली तारीख होऊन दोन दिवस झाले तरीही कंडक्टरची आणि माझी गांठ पडली नाहीं. श्रीपादही पुनः भेटला नाहीं. तीन तारखेला ऑपेरा हाऊसच्या ट्रॅममध्यें कंडक्टर पुनः मला दिसला.

मला पहातांच त्यानें सलाम केला आणि म्हटलें, “ रामराम साहेब ! ”

मीही त्याला उलट सलाम केला आणि म्हटलें, “ गुड मॉर्निंग ! ”

तिकीट द्यायला तो माझ्याजवळ येईल म्हणून मी त्याची वाट पाहिली. एकदम आठ आणे त्याला देऊन ते परत न घेतां त्याला खुष करायचें असें मनाशीं ठरवून रुबाबांत मी एक अधेली अगोदरच मुठींत घेऊन ठेविली होती.

पण धोबीतलावापर्यंत ट्रॅम आली तरी त्याला माझ्याकडे येण्यास फावलें नाहीं गर्दीमुळें.

तो आला तेव्हां त्याच्या हातांत मी अधेली देत म्हटलें, “ फ्लोरा फाऊंटन ! ”

त्यानें अधेली आपल्या नेहमींच्या संवयीप्रमाणें वाजवून पाहिली.

तिचा आवाज बद्दु निघाला.

“ साहेब, अधेली खोटी आहे ! ”

“ असं ? ” मी अधेली हातांत घेतली आणि तिची थोडी पहाणी केली. कंडक्टरचें म्हणणें खरें असल्याचें मला आढळून आलें.

मी खिसा चाचपून पाहिलें. दहा रुपयाची एक नोट आणि चार आणे एवढीच संपत्ति माझ्या खिशांत वास करीत होती.

त्याला बक्षिस देण्याचा बेत मला अर्थात् रद्द करावा लागला. दहा रुपयांची नोट द्यावी तर आठ आणे घ्यायला सांगून बाकीचे पैसे परत घेणें भिकाऱ्याला एक पैसा देऊन दोन पै परत घेण्यासारखें झालें असतें. त्याची तर मला अतिशय चीड. तेव्हां बक्षिसाचा बेत निकालांत काढून मी चार आणे त्याच्या हातावर ठेवले.

त्यानें फाऊंटनचें एक तिकीट मला देऊन तीन आणे माझ्या हातावर ठेवले.

" असं काय? आपले परवांचे दोन आणे घ्याना!'

कंडक्टर हंसला.

" आपल्या दुसऱ्या साहेबांनीं काल दिले ते मला!" त्यानें शांतपणें मला सांगितलें.

" असं होय?" असे म्हणून मी निराशेनें तीन आणे खिशांत टाकीत गप्प बसलों.

कंडक्टर आपल्या कामाला लगेच निघून गेला. मी त्याच्याकडे मधून मधून पहात होतों.

आणि ज्या ज्या वेळीं मी त्याच्याकडे पाही त्या त्या वेळीं तो हंसत असलेला मला दिसत होता.

त्या दिवशीं सायंकाळीं श्रीपादची गांठ पडली. त्याच्या पाठीवर थाप देत मी विचारलें, " कायरे, पैसे दिलेस त्या कंडक्टरचे?"

" म्हणजे? तूं दिलेस ना?" त्यानें मला उलट प्रश्न केला.

" मी? मी नाहीं बुवा दिले. तो तर आज मला म्हणाला कीं तूं दिलेस!"

" नि मलाही तो काल सायंकाळीं भेटला तेव्हां तूं दिलेस म्हणाला!"

" मोठा विलक्षण दिसतो म्हातारा!"

" खरंच मोठा विलक्षण दिसतोय्!"

" आमच्यावर उपकारच करायला पाहतोय्!"

मी कांहीं क्षण थांबून विचार केला.

मला एक युक्ति सुचली.

" हें पहा, आपण असं करूं!" मी म्हटलें.

" कसं करूं?"

आणि श्रीपादच्या कानांत मी जेव्हां त्याला युक्ति सांगितली तेव्हां तो एकदम ओरडला, " बास बास! अस्संच करायचं! बेटा आमच्यावर उपकार करायला पहातोय नाहीं? ठीक आहे म्हणावं. आम्हालाही उपकार करतां येतात. चल, हे घे पांच रुपये!"

श्रीपादनें पांच रुपयांची एक नोट माझ्या हातांत दिली.

मी ती हातांत घेऊन तिची चौघडी करून आंतल्या खिशांत ठेवून दिली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं श्रीपाद आणि मी मुद्दाम ऑपेरा हाऊस जवळ राहून तो दिसेल म्हणून वाट पहात राहिलों.

आम्हाला फार वेळ तिष्ठत राहावें लागलें नाहीं. तो ज्या ट्रॅमवर होता त्या ट्रॅमवर आम्ही चढलों.

आम्हाला त्यानें पाहिलें असावें कारण तो शक्य तेवढा आमच्या डोळ्याला डोळा देण्याचें टाळीत होता.

पण त्याला आमच्याकडे आल्याखेरीज गत्यंतरच नव्हतें मुळीं.

तो आम्हाला टाळीत आहे हें आम्हीं ओळखलें. आणि ठरविलें कीं त्याला मागील प्रकाराची ओळखच द्यायची नाहीं मुळीं.

तो आमच्यापुढें आला.

आम्ही त्याला कुठें जायचें तें सांगून दोन तिकीटांची मागणी केली.

त्यानें दोन तिकीटे फाडून आमच्या हातावर दिलीं—

मी त्याला विचारलें, "पांच रुपये सुट्टे आहेत का?"

त्यानें आपल्या पिशवींत पाहिलें आणि नकार दर्शविला.

मी कोटाच्या आंतल्या खिशांतून चौघडी केलेला पांच रुपयांच्या नोटेचा कागद बाहेर काढला आणि त्याच्या हातीं देत म्हटलें,

"बरं, मग राहूं द्या ही नोट तुमच्याजवळ. पुन: भेटूं तेव्हां बाकीचे पैसे द्या परत!"

या वेळीं धोबीतलावावर ट्रॅमगाडी आली होती. मी श्रीपादला हळूंच चिमटा घेतला.

आणि तो कंडक्टर कांहीं बोलण्याचा प्रयत्न करीत असतांच आम्ही धोबीतलाव स्टेशनवर उतरलों.

कंडक्टर मागून हांक मारीत होता. "साहेब, साहेब!" बराच दूर गेल्यावर मी मागें वळून पाहिलें, कंडक्टर ती नोट हातांत धरून

आम्हांला कांहीं खुणा करून सांगत होता.

पण आम्ही त्याला कुठले दाद देणार ? त्याच्या उपकारावर मात करायचें ठरविलें होतें ना ? आतां ते बाकीचे पैसे परत घ्यायला आम्हीं कुठें त्याला भेटणार होतों ?

दुसऱ्या ट्रॅममध्यें बसून आम्ही ऑफिसांत जायला निघालों.

तिकीट काढण्यासाठीं मी खिशांत हात घातला. आणि माझ्या हाताला जें कांहीं लागलें त्यानें माझी छाती तर पुरी फाटूनच गेली.

कांहीं सुट्ट्या नाण्यांबरोबर श्रीपादनें दिलेल्या पांच रुपयांच्या नोटेची चौघडी होती.

" अरे, ही तर नोट इथें आहे माझ्याजवळ ! "

" मग त्याला कुठली दिलीस ? " श्रीपादनें विचारलें.

मी सारा खिसा पालथा घातला. त्याचा कोपरान् कोपरा शोधला.

पण मला हवी असलेली वस्तु कांहीं सांपडली नाहीं.

" मग तें त्याला दिलेलें गोवा लॉटरीचं तिकीट होतं तर ! " मी उद्गारलों.

" भले, त्याला आतां पहिल्या नंबरचं लाखाचं बक्षिस लागायचं ! " श्रीपाद ओरडला.

" नाहीं रे, गेल्या महिन्याचा फुकट गेलेला नंबर होता तो ! " मी खजील होऊन उत्तर दिलें.

---

## वज्राघात : १५

आणि त्या रात्रीं कामिनीला त्यानें सांगितलें—' मी आतां माझ्या घरीं जाणार. तुझी तूं मुखत्यार आहेस. तुझा माझा कांहीं संबंध उरला नाहीं या उप्पर.'

कामिनीला तो वज्राघातच वाटला.

त्यामुळें तिचें कोमल अंत:करण अतिशय दु:खित झालें.

ती कांहीं बोलली नाहीं. भाऊरावाच्या अनपेक्षित उत्तरानें ती अगदीं भांबावून गेली होती.

बऱ्याच वेळानें तिनें विचारलें, ' मग मला सोडून जाणार तर तूं?'

' हो, माझा निश्चय कायम आहे. त्यांत फरक पडायचा नाहीं!'

' असं एकाएकीं तुझ्या मनानं काय घेतलं हें?'

' कामिनी, मी आतां घरीं जाणार आहें. घराची ओढ माझ्या मनाला तीव्रतेनं लागली आहे. या जिण्याचा मला तिटकारा येऊं लागला आहे.'

' या जिण्याचा तिटकारा नाहीं तुला आलेला भाऊराव. मी आतां पूर्वीसारखी सुंदर दिसत नाहीं तुझ्या दृष्टीला. त्यामुळं माझा तिटकारा येत आहे तुला. नि म्हणूनच मला सोडून जावंसं वाटतंय् तुला. तुझ्या सौंदर्यदृष्टीला माझं कोमेजणारं रूप कसं आवडेल आतां?'

' कांहींही म्हण तूं! पण माझा जाण्याचा निश्चय हा कायम. तूं आपली तयारी कर. या आठवड्यांत मी जाणार.' भाऊरावानें निश्चयानें उत्तर दिलें.

कामिनीनें निराशेनें एक दीर्घ श्वास सोडला.

आणि क्षणभरानें तिनें उद्वेगानें उत्तर दिलें, ' बरं, मर्जी तुझी. मंगेशाचा कोप झाला माझ्यावर म्हणून त्यानं तुला अशी बुद्धि दिली. तो ठेवील त्या स्थितींत राहिलं पाहिजे.'

त्या दिवसापासून तीं दोघेंही आपल्या मनाची तयारी करीत होतीं.

भाऊराव आपल्याला सोडून जाणार ही कल्पनाही तिच्या अंतःकरणाला सहन होत नव्हती. तो आपल्याला सोडून जाणार हें ती आपल्या मनाला वारंवार बजावून सांगत होती आणि त्याबद्दल मनाची तयारी करण्याचा ती प्रयत्न करीत होती.

आणि सोडून जातों म्हटलें तरी तसें वागणें किती कठीण आहे याचा प्रत्यय भाऊरावाला येत होता. तिच्या सुखद सहवासांत त्यानें आपल्या ऐन तारुण्याचीं सात वर्षें घालविलीं होतीं. त्या सात वर्षांत असा एकही दिवस त्याला आठवत नव्हता कीं, त्याला तिची घृणा उत्पन्न झाली. उलट मोगरीच्या सुवासानें मन जसें जास्त जास्त उन्मादक होतें तसा अनुभव तिच्या संगतींत त्याला आला होता. तिचें उन्मादक सौंदर्य, तिचें मधुर भाषण, तिचें रम्य वर्तन आणि तिन्ही काळीं लोभनीय वाटेल असा तिचा सहवास यांनीं त्याला आपलें आयुष्य धन्य झालें असेंच वाटत असे.

ज्वानीच्या ऐन भरांत दोघांची गांठ पडली होती. भाऊराव त्यावेळीं अवघा बावीस वर्षांचा किशोर होता. बी. ए. ची परीक्षा पास होऊन नुकताच तो चांगल्या नोकरीलाही लागला होता. एका गाण्याच्या मैफलींत ती त्याच्या दृष्टीला पडली. तिचें गाणें आणि नृत्य यांच्यापेक्षां तिच्या अनुपम सौंदर्याचाच पगडा त्यावेळीं त्याच्या अंतःकरणावर अधिक बसला. कॉफीपानाच्या वेळीं त्यानें तिची ओळख करून घेतली. तेव्हां कामिनीही त्या किशोराच्या तेजदार लावण्यावर मोहित झाली. तारुण्य हें वयावर थोडेंच अवलंबून असतें? तें बाविशींत जसें असतें तसें तिशींतही उफाळत असतें. अशा वेळीं वयाचें अंतर दृष्टीला

दिसत नसतें. तेवढी तारुण्याची भावनाच मनाला आणि दृष्टीला प्रतीत होत असते. भाऊराव आणि कामिनी यांचेंही तसेंच झालें. तो बावीस वर्षांचा कुमार आहे आणि ती तीस वर्षांची प्रौढा आहे याचें त्यांच्या प्रणयी मनाला भान राहिलें नाहीं वयानें थोर अशा स्त्रीवर आणि लहान अशा पुरुषावर प्रेम करतां येत नाहीं हा व्यवहारी नियम निसर्गानें झुगारून दिला.

आणि लवकरच कामिनीला घेऊन भाऊराव एका स्वतंत्र जागेंत राहूं लागला.

घरंदाज कुमारिकांऐवजीं एका गोवेकरणीला आपल्या हृदयाची स्वामिनी केल्याबद्दल भाऊरावाला समाजानें दोष दिला. मूकपणें त्याच्यावर प्रेम करणाऱ्या अनेक कुमारिकांची निराशा झाली.

पण या सर्वांहून कामिनीच्या सहवासाचेंच महत्त्व भाऊरावाला अधिक वाटलें.

आणि या उन्मादाच्या भरांत तिला एक वर्षाचें मूलही आहे याचें त्याला कांहीं वाटलें नाहीं. उलट त्या मुलीचा त्याला लळाच लागला. जणुं ती मुलगी आपलीच आहे अशा भावनेनें तो वागूं लागला. ती मोठी होऊन शाळेत जाऊं लागली तेव्हां शाळेंत, आपल्या नांवापुढें भाऊरावाचेंच नांव लावूं लागली.

परंतु त्यानंतरच्या सात आठ वर्षांच्या काळानंतर कामिनीचें रूप कांहीं पूर्वीसारखें राहिलें नव्हतें. हिरवें पान केव्हां पिवळें होतें हें कांहीं सांगतां येत नसतें. तें इतक्या हळू हळू पिवळें होतें कीं, लगेच आपण म्हणतों—अरे, हें पान पिवळें झालें की! माणसाचें तारुण्यही तसेंच असतें. तारुण्याच्या ज्वानीवर जरा इतक्या हलुवारपणें आपला अंमल पसरते कीं, त्याची चाहूल त्या व्यक्तीलाही कळत नाहीं.

कामिनीच्या रूपांतील सूक्ष्म रूपांतर भाऊरावाच्या दृष्टीला अलिकडे दिसूं लागलें होतें. ती वृद्धपणाकडे झपाट्यानें जात आहे असेंच भाऊरावाला वाटलें.

आणि तो स्वतः तर तारुण्याच्या ऐन बहरांत विहार करीत होता.

त्याच्या अंतःकरणांत अलिकडे असे विचार येत होते—कामिनी आतां वृद्ध होत जाणार. अशा वृद्ध नारीबरोबर का मी आयुष्य कंठायचें ?

आणि त्याचें मन आपल्या तरुण अंतःकरणाला साथ देईल असें अंतःकरण शोधूं लागलें.

भाऊराव आपल्याला सोडून जाणार हें कळल्यापासून कामिनीला आपल्या वृद्धपणाची जाणीव विशेष तीव्रपणें होऊं लागली होती. शृंगारण्यासाठीं ती रोज आरशांत पाही. पण आतां आरशांत पाहून आपल्यांत कितपत तारुण्य राहिलें आहे याचा ती शोध करूं लागली.

तेव्हां तिला कळून आलें—आपलें तारुण्य, बहर संपल्यावर क्वचित् दिसणाऱ्या मोहरासारखें झालें आहे. त्याच्यांत तेज नाहीं कीं आकर्षकपणा नाहीं. मग भाऊराव आपल्याजवळ कसा राहील ? तो आपल्यापासून दूर दूरच जाणार. हो, जाणारच. दोघांनीं एकत्र राहावें असें कोणतें बंधन आहे आपणांत ? आपण त्याची लग्नाची बायको थोडीच आहोंत ? दोघांचा स्नेह कायम टिकण्यासाठीं दोघांचें मूलही जन्माला आलेलें नाहीं. मग भाऊरावाला कोण रोधून धरूं शकणार ? तो जाणारच. मग कामिनीनें काय करावें ? ज्या भांडवलावर प्रीतीचा सौदा मांडला तें सौंदर्यच नष्ट झाल्यावर स्त्री काय करूं शकणार ?

कामिनी अगदीं अगतिक झाली होती.

परंतु कांहीं इलाज नव्हता.

भाऊराव जाणार हें तिच्यापुढें स्पष्ट दिसत होतें.

आणि ती आपल्या मनाची तयारी करीत होती.

आपले भाऊ आपल्याला सोडून जाणार हें जेव्हां कामिनीकडून पिरोजला कळलें तेव्हां तिला आश्चर्याचा धक्का बसला. आणि त्याचबरोबर ते आपले खरे वडील नव्हेत हें जेव्हां तिला समजून आलें तेव्हां तो आघात तिला सहन करणें कठीण होऊन गेलें.

ती आपल्या आईशीं अधिक कांहीं बोलली नाहीं. मनांतल्या मनांत ती कष्टी झाली. ती आपलें दुःख मूकपणें सहन करीत होती.

भाऊरावाशींही त्या दिवसापासून अधिक कांहीं बोलली नाहीं.

शेवटीं भाऊराव जाण्यास निघाला.

त्यानें आपलें सामान एकत्र केलें आणि हमालाच्या डोक्यावर चढविलें.

पिरोज आणि कामिनी त्याच्या हालचाली पहात होतीं.

मात्र कामिनी त्याच्याकडे व्याकुळतेनें पहात होती. आणि पिरोज निर्विकार दृष्टीनें.

जाताना भाऊरावानें हांक मारली, ' पिरोज ! '

पिरोज आली.

त्याच्यासमोर येऊन उभी राहिली.

तिनें विचारलें, ' काय भाऊ ? '

तिच्या दृष्टीला दृष्टि न देतां भाऊराव म्हणाला, ' पिरोज जातों मी ! '

' बरं आहे ! ' पिरोजनें शांतपणें उत्तर दिलें.

भाऊरावाला केवढा तरी धक्का बसला !

पिरोज रडेल, आपल्याला मिठी मारील; जाऊं नका म्हणून आपली विनवणी करील. मग आपण तिला वरचेवर भेटण्याचें वचन देऊं अशी भाऊरावाची कल्पना होती.

पण ती पिरोजच्या वागण्यानें पार कोसळून पडली. आपल्या पोटची नसतांनाही जिच्यावर आपण एवढें प्रेम केलें त्या आपल्या लाडक्या पिरोजनें असें वागावें याचें त्याला मोठ्यांत मोठें आश्चर्य वाटलें. आणि त्या आश्चर्यभरांत त्यानें आपली टोपी काढून घेतली.

भाऊरावाला निरोप देऊन जणुं कांहीं घडलेंच नाहीं अशा आविर्भावानें पिरोजनें आपलें पुस्तक काढलें आणि टेबलासमोर खुर्चीवर बसून ती शब्द पाठ करूं लागली:

'एम् आय् एन् डी. माइंड म्हणजे मन किंवा अंतःकरण–मन किंवा अंतःकरण!'

भाऊरावाला हा अनपेक्षित असा वज्राघातच वाटला.

त्यानें कांहीं क्षण विचार केला. आणि डोकीवर बॅग घेऊन उभ्या असलेल्या हमालाला सांगितलें, 'अरे, राहूं दे तें सामान. हे दोन आणे तुला घे. जा. नाहीं न्यायचं सामान!'

भाऊराव लगबग पिरोजजवळ आला.

त्यानें हांक मारली, 'पिरोज!'

पिरोजनें पुस्तक बाजूला करून त्याच्या डोळ्याला डोळा दिला.

भाऊराव रडत होता.

त्यानें तिला आवेगानें हृदयाशीं धरली.

आतां मात्र पिरोज त्याच्या गळ्यांत हात घालून रडूं लागली.

'पिरोज, तुझ्या भाऊवर तूं रागावलीस?'

'नाहीं भाऊ, पण मला सोडून जाणार नाहीं ना तुम्हीं?'

कामिनीच्या डोळयांत आतां अश्रूंच्या झिरपणीबरोबर आनंदोर्मीही उसळुं लागल्या.

भाऊरावानें तिच्याकडे पाहिलें त्यावेळीं ती गालांतल्या गालांत हंसत होती.

---

# कवीचें हृदय : १६

डेक्कन जिमखान्याच्या बाजूला असलेल्या एका रम्य बंगल्यावरून सतारीचे बोल वातावरणांत पसरत होते. सकाळची प्रसन्न वेळ. अजून सूर्योदयही झालेला नाहीं. हवेंत सुखकारक असा गारवा होता. त्यामुळें गाण्याचे स्वर मनाला फारच मोहित करीत होते. तशांत सतारीवर जें गाणें वाजविलें जात होतें तेंही तसेंच भावपूर्ण होतें.

तुजकडे पाहतों पुनः पुन्हा
माझाच गडे, हा काय गुन्हा !

बंगल्याच्या वरच्या मजल्यावर बसून सीताराम हें गाणें सतारींतून वाजवीत होता. गाण्याचे ध्वनि आणि भावनेची व्याकुलता यांचा जणुं संगमच झाला होता. ऐकणाराचे कान तिकडेच लागतील, त्याला वेडें करतील अशीच जादू त्या स्वरांत होती. सीतारामची तर जणुं समाधीच लागली होती. त्याचे भावपूर्ण विशाल डोळे मिटले होते. मांडीवर ठेवलेल्या सतारीच्या तारांवरून त्याचीं नाजूक गोरींपान बोटें झरझरा फिरत होतीं. त्याच्या कंठांतून गानमाधुरी बाहेर पडत होती.

कुणीही वेडें झालें असतें त्या गाण्याने.

आणि वेडें झालेंही होतें. गाण्याचे स्वर कानीं पडतांच समोरच्या बंगल्याच्या माडीवरील खिडकी उघडली गेली आणि एक तरुण मुलगी खिडकीवर कोंपर टेकून, कोंपरावर आपला गाल टेकून गाणें ऐकत राहिली— सीतारामची गानसमाधी तन्मयतेनें पहात राहिली. तिचे डोळे जणुं त्याचें रूप आपल्यांत सांठवित होते अशीच ती व्याकुलतेनें पहात होती.

आणि इकडे सीतारामच्या घरांत खालीं संध्या करीत बसलेले त्याचे वडिलही सतारीचे स्वर कानीं पडतांच आपली संध्या विसरले होते. पण तें क्षणभरच. जी कविता सतारीवर गायली जात होती तिच्यामुळें ते थोडे अस्वस्थ झाले. अशीं प्रेमगीतें सीतारामनें गावीं याचा त्यांना विषाद वाटला. ते मनांत म्हणाले—सीताराम अलिकडे असं काय करूं लागला आहे ? त्याच्या कविताही अलिकडे निराळ्याच दिसूं लागल्या आहेत. त्यांत देवाची आळवणी दिसून येत नाहीं. त्याचं मन तर बिघडलं नसेल ? छे ! छे ! असं होतां कामा नये.

पण हा विषाद क्षणभरच टिकला.

ते पुनः स्वतःला सांगूं लागले–साधु तुकारामानंही केल्या आहेत अशा कविता. ‘ रूप पाहतां लोचनीं सुख झालें हो साजणी ’ ही कविता तुकारामाचीच नाहीं का ? हें गूढगुंजन आहे, देवाला सखीची उपमा देणं किंवा आपण त्याची सखी होणं–या नात्यांनीं त्याच्याशीं प्रेमालाप करणं ही संत कवींची परंपराच आहे मुळीं. माझ्या सीतारामनंही त्यांचंच अनुकरण केलेलं दिसतं, त्यांत काय एवढं वाईट झालं ?

या विचारांनीं त्यांना विलक्षण आनंद वाटला. सीतारामबद्दल अभिमान वाटला. असा गुंडा पुत्र आपल्या कुळांत निपजल्याबद्दल त्यांनीं देवाचे आभार मानले. आणि विसरलेली संध्या पुरी केली.

वरून सतारीचे स्वर खालीं येत होते. देवपूजा चालली होती तरी त्यांचें लक्ष त्यांत फारसें नव्हतें. त्यांचें मन सीतारामबद्दलच सारखा विचार करीत होतें. त्यांना सीतारामबद्दल अभिमान वाटत होता. ते स्वत:लाच सांगत होते–प्रोफेसर असूनही मी ह. भ. प. आहे. संत वाङ्मयाचा अभ्यास केलेला माझ्यासारखा जाडा विद्वान उभ्या महाराष्ट्रांत सांपडायचा नाहीं–एवढा शिकलों असूनही मी पंढरपूरची वारी दर वर्षी करतों. माझ्यासारख्या साधुसंतांच्या सहवासांत काळ कंठणाऱ्या गृहस्थाच्या पोटीं सीतारामसारखा बालसाधु जन्मावा यांत नवल नाहीं. देवाची कृपाच आहे ही माझ्यावर. शुद्ध बीजापोटीं फळें रसाळ गोमटीं.

त्यांना सीतारामचें बाळपण आठवूं लागलें: सीताराम तीन वर्षांचा

झाला नाहीं तोंच तो मी म्हणत असलेले अभंग म्हणूं लागला. त्याला माझ्यासारखें गुणगुणण्याचें वेड लागलें. तो पांच वर्षांच्या आंत चांगलें लिहूंही लागला. पांचव्याच वर्षी त्यानें पहिली कविता लिहिली. कवितेचा विषय ‘ कावळा आणि चिमणी ’ हा होता. त्या वेळीं मला केवढा आनंद वाटला. पण ज्या विषयावर त्यानें कविता लिहिली तो विषय कांहीं मला आवडला नाहीं. त्यानें फार तर देवाविषयीं कविता लिहावी असें मला वाटलें. त्यानंतर त्यानें ‘ मांजरीचीं पोरें ’, ‘ खार ’, ‘ आई ’ ‘ सर्प ’ यांसारख्या क्षुद्र विषयांवर कविता लिहिल्या. सर्वांना त्याचें कौतुक वाटलें. पण मला कांहीं हे विषय आवडले नाहींत आणि त्याच्या प्रतिभेला वळण लावायचें मी ठरविलें. आपल्यासारख्याच्या पोटीं कुणीतरी साधुसंतच जन्माला आला आहे असें आपल्याला वाटलें म्हणून त्याला आपण अभंग करायला उत्तेजन दिलें. देवावरच कविता लिहावी इतर विषयांवर कविता लिहूं नये म्हणून त्याला सांगितलें—जवळजवळ सक्तीच केली. तेव्हां त्यानें देवावर एक कविता लिहिली. त्या कवितेंत त्यानें म्हटलें होतें:

‘ देव ! देव, बाबांना कां आवडतो तें मला कळत नाहीं. मला तर मुळींच आवडत नाहीं तो. तो आहे काळा. त्याला नाहीं बोलतां येत, चालतां येत. त्यापेक्षां आमच्या खळ्यांतल्या आंब्यावर नाचणारी खार किती चांगली आहे ! ती मला आवडते. मी तिच्याबरोबर गाणें म्हणतों, तिचा पाठलाग करतों. तीही माझ्याबरोबर शिवाशिवीचा खेळ खेळते. तिलाच कां देव म्हणत नाहींत बाबा ! आमचीं मांजरीचीं पोरें किती छान छान आहेत. गोरीं गोरीं पान दुधासारखीं. नि माझी आई कित्ती सुरेख आहे ? तिलाच कां म्हणूं नये देव ? ’

त्याच्या या कवितेवरून मी त्याच्यावर किती रागावलों होतों ! त्या रागाच्या भरांत त्याची ती कविता मी फाडूनही टाकली आणि त्याच्यावर सक्तीच केली, कीं तूं अशा अशा मी सांगेन तशा कविता लिही. त्याच्याकडून मी सारा तुकाराम पाठ करून घेतला. रामदास तर रोज पढवूं लागलों—

आणि तोही मग तुकाराम रामदासांसारख्या कविता आणि अभंग लिहूं लागला. मला धन्यता वाटली. अस्मान ठेंगणें वाटलें. त्या दिवसांपासून त्यानें रोज एक अभंग केला पाहिजे असा मी त्याच्यावर निर्बंध घातला. आज त्याच्या अभंगांचे सतरा भाग छापून निघाले आहेत.

त्याला त्या दिवसापासून मी साधू बनवायचें ठरविलें. आज त्याच्या वयाला बावीस वर्षें झालीं–एवढ्या लहानशा अवधींतही तो एक बालसाधु म्हणून साऱ्या महाराष्ट्रांत गाजतो आहे. दर वर्तमानपत्रांत त्याचा फोटो प्रसिद्ध होतो आहे. दर मासिकांत त्याच्या पारमार्थिक कविता प्रसिद्ध होत आहेत. तो साधु झालाच आहे. पण तो माझा मुलगा म्हणून लोक माझ्याही पायां पडत असतात. तीर्थ घेतात. डेक्कन जिमखान्यासारख्या बाजूच्या वस्तींतही लोकांची वर्दळ माझ्या घरीं सारखी सुरू आहे. किती मी धन्य !

त्यानें तुकारामासारख्या कांहीं शृंगारिक कविता केल्या तरी त्याचा अर्थ लाक्षणिक घ्यायचा. गोपी आणि कृष्ण यांच्या लीला त्यानें गायल्या म्हणून काय झालें ? ‘साधुसंतांचा तो संप्रदायच आहे.’

त्यांना संतोष वाटला. संतोषाची झळाळी त्यांच्या मुखावर दिसूं लागली. त्या आनंदाच्या भरांत त्यांनीं जोरजोरानें घंटा वाजवायला सुरवात केली.

इकडे सीताराम अजूनही समाधींतून जागा झाला नव्हता. त्याच्या गोड गळ्यांतून निघालेले मधुर स्वर वातावरणांत इतस्ततः निनादत होते. समोरच्या खिडकींतील रमणी त्यामुळें व्याकुळ होत होती.

आणि त्या भावनेच्या भरांत ती केव्हांच त्याच्या दारावर येऊन उभी राहिली.

सीतारामचें गाणें संपलें. त्यानें सतार खालीं ठेविली आणि समोर पाहिलें–आपल्या सुखस्वप्नांतील रमणीच प्रत्यक्ष समोर येऊन उभी राहिली आहे कीं काय असें त्याला वाटलें.

त्याचें भान हरपलें. ज्या देवीची आपण आराधना करीत होतों तीच समोर येऊन उभी राहिलेली पाहून तो भांबावून गेला.

त्यानें तिच्याकडे पाहिलें.

तिच्या दृष्टींत जे भाव त्यांला दिसले त्यानें त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. कांहीं तरी गोड गोड असें अनुभवाला येत आहे असें त्याला वाटलें.

त्यानें तिच्याकडे भावविवशतेनें पाहिलें.

कांहीं क्षण असे गेले कीं कुणालाच शुद्ध राहिली नाहीं.

भानावर येतांच ती तरुणी हलक्या पावलांनीं जिना उतरून निघून गेली.

सीताराम बेचैन झाला.

सीताराम विचार करूं लागला—हे असें काय होत आहे—ऊर असा धपापत कां आहे ? अलिकडे पूर्वीसारखी अभंग रचना करण्याचा आपणाला कंटाळा कां यावा ? राधाकृष्णाचीं विरहगीतेंच आपल्या लेखणींतून जास्त कां यावींत ? त्यांच्या मुग्ध प्रणयलीलाच आपणाला कां आवडाव्या ?

असें अलिकडे होत होतें खरें. त्याच्या अभंगांत न दिसणारें अवर्णनीय असें कांहीं तरी त्याच्या कवितांत दिसून येऊं लागले होतें. त्याला अभंग झाडांच्या पानांसारखे राकट वाटत तर आतांच्या कविता सुवासिक फुलांसारख्या वाटूं लागल्या. पूर्वीं देवाच्या नांवापलिकडे त्यांत कांहीं नसे. आतां भावना उचंबळून उठतील असें कांहीं तरी विलक्षण त्याच्या कवितांत दिसून येई. त्यानें राधा आणि कृष्ण हीं नांवें न लिहिलीं असतीं तर त्याची कविता कुणातरी आधुनिक प्रतिभा संपन्न कवीचीं प्रेमगीतेंच वाटलीं असतीं.

हें कसें होत होतें हें सीतारामाला कळत नव्हतें. वयाच्या सतरा अठरा वर्षांपर्यंत त्यानें देवाची खूप आळवणी केली. पण त्यानंतर मात्र त्याच्या जिवाला कसली तरी अज्ञात हुरहूर लागत राहिली. त्याला कंटाळा येऊं लागला. साधु म्हणून त्याच्या दर्शनाला येणाऱ्या स्त्रीपुरुषांच्या गर्दीचा त्याला वीट येऊं लागला. त्यांतच कुणीतरी सुंदर चेहऱ्याची स्त्री दिसली कीं त्याच्या अंतरांत खळबळ उडूं लागली.

आणि याचा परिणाम असा झाला कीं, त्याची कविता दिवसें-दिवस शृंगारिक, भावनापूर्ण आणि तरुणहृदयाचें प्रतिबिंब अशी दिसूं लागली.

आतां समोरच्या खिडकींत त्याला काव्य दिसूं लागलें होतें. त्यावर त्यानें महाकाव्य निर्माण केलें. त्याच्या कवितासरितेला महापूर येऊं लागला. त्याची कवितांची वही भरून गेली. मात्र ही वही गुप्त ठेवण्याची तो खबरदारी घेऊं लागला. त्या कवितांत सतारीचा कंप प्रतीत होत होता.

दिवसें दिवस त्या खिडकींतल्या मुलीची ओळख वाढत गेली. त्याच्या सतारवादनाला आतां काळवेळ राहिला नव्हता. मध्यरात्रीं तर मध्यरात्रीं, पहांटेला तर पहांटेला, तिचे बोल ऐकूं येऊं लागले.

आणि सतारीचा ' दिड्दा ' हवेंत पसरला कीं समोरच्या खिड-कीचा पडदा बाजूला होऊं लागला.

सीतारामला जीवनाचा वीट आला. त्याचा कोंडमारा होऊं लागला. अंगावरचीं भगवीं वस्त्रें त्याला बोचूं लागलीं. तुकारामाची गाथा आणि रामदासाचा दासबोध त्याला दृष्टीसमोर नकोशीं झालीं. तो आतां कुणाची भेट घेण्याचें टाळूं लागला. त्याचा अनुग्रह घेण्यासाठीं जे स्त्रीपुरुष येत असत त्यांना त्याचें आतां दर्शन होणें मुष्किलीचें झालें. जेव्हां पहावें तेव्हां सीताराममहाराज सतारीवर समाधी लावून बसलेले. त्यामुळें त्याचें दर्शन भक्तजनांना महाग झालें.

सीतारामला कांहीं सुचत नव्हतें. वडिलांच्या भीतीनें तो रोज अभंग म्हणे. पण त्यांत त्याचा जीव नव्हता. त्याला तें जिणें नकोसें वाटत होतें. साधु आणि माणूस या दोन भिन्न व्यक्ति असतात याची त्याला चीड येत होती. त्याला साधू व्हायला नको होतें. तो माणूस म्हणून जगूं पहात होता. त्याचें कवीचें हृदय, एका तरुणाचें हृदय, हृदयाला साथ देईल असें हृदय पहात होतें. त्याला हीं बंधनें नको होतीं.

पण वडिलांना हें कसें सांगायचें? महाराष्ट्रभर पसरलेल्या आपल्या स्त्रीपुरुष भक्तांना हें कसें सांगायचें? त्यांना केवढा धक्का बसेल? पण त्यांच्या इभ्रतीसाठीं एका जिवाचा निरपराध बळी द्यायचा?

त्याचा कोंडमारा होऊं लागला.

आणि हा कोंडमारा त्याच्या काव्यांत व्यक्त होऊं लागला.

ज्या मासिकांत त्याचे अभंग प्रसिद्ध होत असत त्यांतून आतां या भावकविता 'भावशर्मा' या नांवानें प्रसिद्ध होऊं लागल्या. त्या कवितांतील तळमळ, आकांक्षा आणि उच्च दर्जाचें काव्य पाहून वाचक अगदीं खूष होऊन गेले.

वडिलांना मात्र सीतारामच्या वृत्तींत झालेला पालट स्पष्टसा कळला नाहीं. पण त्याच्या वागणुकींत फरक पडत चाललेला त्यांना आवडला नाहीं. त्यांनीं सीतारामला विचारलें. पण त्याला आपलें मनोगत व्यक्त करण्याचें धैर्य झालें नाहीं.

पण त्याच्या कवितांची वही एकदां त्यांच्या हाताला लागली. त्यावरून सर्व उलगडा झाला.

तीं प्रेमगीतें वाचून हरिभक्तपरायणांचे डोळे उघडले. एका कवितेंत सीतारामनें लिहिलें होतें — 'हीं बंधनं मला असह्य झालीं आहेत. यांतून केव्हां मुक्त होईन असं झालं आहे आणि जेव्हां मी मुक्त होईन तेव्हां हे राजसे, हंसाच्या पंखांनीं उडून प्रथम तुझ्याकडेच येईन.'

वडिलांना मोठाच धक्का बसला.

त्यांनीं कांहीं विचार मनाशीं केला.

ते तसेंच समोरच्या बंगल्यांत गेले.

आणि एकदोन तासांनीं दोन म्हातारे हंसतहंसत तेथून बाहेर पडले.

त्यानंतर एकदोन आठवड्यांनीं प्रसिद्ध झालेल्या एका बुवाबाजीविध्वंसक साप्ताहिकांत पुढील बातमी प्रसिद्ध झाली:

'अखेर डेक्कन जिमखान्यावरील ढोंगी बुवा सीताराम महाराज याच्या पापांना वाचा फुटली. त्यानें आपल्या शिष्यीणीपैकीं एकीशीं कालच विवाह लावला. ही शिष्यीण समोरच्याच एका बंगल्यांत राहात होती. तरी बरें, या बुवानें लग्न करण्याचा तरी प्रामाणिकपणा दाखविला.'

---

# मंगळसूत्राचें पार्सल : १७

रामचें लग्न होऊन एक वर्ष झालें तरी अजूनही तो ब्रह्मचारीच होता, वैवाहिक जीवनाच्या त्याच्या ज्या कांहीं कल्पना होत्या. त्या अतृप्तच राहिल्या होत्या. सीतेकडून ज्या प्रकारची वागणूक व्हावी असें त्याला वाटत होतें, त्या बाबतींत त्याची निराशाच झाली होती. सीता कांहीं मोठी सुंदर मुलगी नव्हती, पण तिच्या डोळ्यांत आणि चेहऱ्यावर जें एक पाणी खेळत होतें—पाणीदारपणा दिसत होता, त्यानेंच मोहित होऊन रामनें तिला आपली पत्नी करून घेतली होती. सुंदर बायकोपेक्षां तेजदार बायकोच चांगली अशी त्याची पत्नीविषयक कल्पना होती. आणि सीतेला पाहिल्यावर तरी आपल्याला हवी तशी बायको मिळाली असेंच त्याला वाटलें.

पण लग्न होऊन वर्षभराचा काळ लोटला तरी, ती मुग्धाच आहे याचा अनुभव येतांच त्याची दारुण निराशा झाली. ती त्याच्या बरोबर मनमोकळेपणानें वागे, त्याच्याशीं थट्टा विनोदही करी पण या वागणुकींत जें कांहीं आणखी ' निराळेंच ' असायला पाहिजे होतें तें रामला सीतेंत दिसत नव्हतें. तिच्या नजरेत त्याला प्रीतीच्या छटा दिसत नव्हत्या. तेथें एखाद्या मुग्ध बालेच्या दृष्टींतील सात्वीकभावच त्याला दिसून येई. लाजरीला स्पर्श करतांच तिचीं पानें लज्जेनें मिटावीं तसें आपल्या आगमनानें, स्पर्शानें, सीतेच्या बाबतींत व्हावें असें रामला वाटे. पण रामच्या भेटींत, त्याच्या स्पर्शांत सीतेला सवंगड्याच्या भेटीचा, स्पर्शाचा आनंद होई. ती त्याच्याबरोबर एकाद्या बालकासारखी हंसे खेळे.

तिची ही बालवृत्ति पाहून रामला मोठें दुःख होई.

ज्या स्त्रीभावनांची अपेक्षा तो तिच्याकडून करीत होता, त्या सीते-कडून पुऱ्या होत नव्हत्या.

एकाद्यावेळीं त्यानें आवेगानें तिचें चुंबन घेतलें तर त्याला उलट तिच्याकडून तसेंच उत्तर मिळत नसे. उलट लहान मुलाचें चुंबन घेतांच तें जसें आनंदानें, कौतुकानें हंसतें तसें सीता करी.

यामुळें तो असुखी होता. बेचैन झाला होता. तो सारखा विचार करी—सीता कांहीं कुरूप नाहीं, कुढ्या स्वभावाचीही नाहीं–तिला चार मंडळींत हिंडणें फिरणें गप्पा मारणेंही आवडतें–तिच्या स्वभावानें ती सर्वांची आवडती होऊन राहिली आहे–मग माझेंच मन ती कशी रंजवूं शकत नाहीं! तारुण्याच्या सुकुमार भावना तिच्या अंत:करणांतच नाहींतच का? ती मला सुखी का करूं शकत नाहीं?

असे विचार करीत तो रात्रींच्या रात्रीं तळमळून काढीत होता. एकादेवेळीं तो झोपेंतून मध्येंच जागा होई आणि बाहेर पाही तों–चांदणें कसें छान छान पडलें आहे! तो त्या चांदण्याकडे सारखा टक लावून पाही. बाहेरच्या त्या वातावरणाचा त्याच्या मनावर विलक्षण परिणाम होई आणि अशावेळीं त्याला वाटे–आपला जीव गुदमरतो आहे—तो कोंडला आहे–त्याची बाहेर येण्यासाठीं तडफड चालली आहे.

सीतेच्या अशा वर्तनानें त्यानें ठरविलें–राम, तूं आतां जन्मभर वनवासीच राहाणार. घरांत असून रानांत असल्यासारखें जीवन तुला कंठावें लागणार. तुझें वैवाहिक जीवन फुकट फुकट जाणार.

घरांत सीतेला समवयस्क अशा नणंदा, जावा होत्या. त्यांच्या बरोबर ती एकाद्या मैत्रिणीसारखी वागे. ती त्यांच्यांत सदा मिळून मिसळून असायची. ती त्यांच्या गळ्यांत गळा घाली. त्यांच्याशीं थट्टा विनोद करी, त्यांच्या अंवती भवंती राही—अगदीं एकाद्या जिवाभावाच्या मैत्रिणी सारखी त्यांच्याशीं वागे. तिच्या अशा गुणी स्वभावामुळें ती सर्वांची आवडती होऊन राहिली होती.

सारींजणें रामची आणि तिची थट्टा करीत. अशी थट्टा केली

म्हणजे सीता फारशी लज्जान्वित होत नसे. उलट नणंदाजावांची तोंड-भर थट्टा करी, त्यांचे गालगुच्चे घेई, त्यांना चापट्या धम्मकलाडू यांचा प्रसाद देई. तिचें तें वागणें पाहून तिच्या निष्पाप स्वभावाबद्दल सर्वांना आनंद होई. तीं म्हणत-अजून पोर आहे आमची सीता. एक पोर होईस तंवर असंच चालायंच हें.

तिचें असें सर्वांकडून कौतुक होई. पण रामला त्याचें काय होय! तो नुसता मनांत जळत होता.

आणि त्याची उदास वृत्ति पाहून सर्वांना नवल वाटे-राम अजून कसा सीतेशीं जुळतें घेत नाहीं? नवरा बायको अजून कशीं समरस होत नाहींत?

वर्ष दीड वर्ष असेंच गेलें. त्यांच्या जिवाशिवाची जोडी अजून कांहीं जमत नव्हती. राम मनांतल्या मनांत खंगत चालला होता. आणि सीता दिवसें दिवस तेज दिसत होती.

तिच्या तेजानें राम आतां तर तिच्यावर अधिकच मोहित होऊं लागला होता. पण—

त्याला अलिकडे संशय येऊं लागला-सीता आपल्याला कां टाळते? कांहीं दोष तर तिच्यांत नसेल? तिचा दोष मला लागूं नये म्हणून तर ती मला दूर दूर ठेवीत नसेल?

या कल्पनेनें त्याचें चित्त थरारलें. अशा अनेक गोष्टी त्यानें ऐकिल्या होत्या.

तसेंच कांहीं नसेल ना?

त्याचा संशय दृढ होऊं लागला.

त्याला किळस आली. सीतेचा त्याला अनिवार राग आला. आपल्या जन्माचा खेळखंडोबा झाल्याबद्दल तो बेचैन झाला.

संशयानें त्याच्या अंतःकरणांत ठाण मांडलें.

आणि त्या दृष्टीनें तो सीतेकडे पाहूं लागला. त्याला खात्रीच वाटूं लागली.

त्या दिवसापासून त्यानें तिचें नांव टाकलें. पूर्वी तो तिची आराधना करी पण आतां तो शक्य तेवढें तिला टाळूं लागला.

घरांत कुजबूज सुरू झाली. नवरा बायकोचें कां बिनसावें याचा कुणालाच अंदाज करतां येईना. दोघांना विचारायला मात्र कुणीच धजावत नव्हतें.

रामला घरांत राहाणेंही असह्य झालें. तो पंधरा दिवसांची रजा काढून कुठेंतरी निघून गेला.

जाण्यापूर्वी त्यानें आपल्या आईला पत्र लिहून ठेविलें. त्यांत त्यानें आपला संशय व्यक्त करून, सीतेची माहेरीं रवानगी करावी, ती या घरांत असेपर्यंत आपण येणार नाहीं असें लिहून ठेविलें होतें.

त्याच्या पत्रानें घरांत दूषित वातावरण निर्माण झालें. सीतेकडे प्रत्येकजण संशयी नजरेनें पाहूं लागलीं. सीता पूर्वीसारखी जावानणंदांशीं बोलायला गेली कीं, त्या तिच्याशीं पूर्वीसारख्या बोलेनाशा झाल्या. ती त्यांच्या अंगाशीं लगट करायला आली कीं, त्या तिला दूर ठेवूं लागल्या. सीतेला याचा अचंबा वाटला. वाईटही वाटलें.

त्यानंतर दोन दिवसांनीं पत्र पाठवून बोलाविल्याप्रमाणें सीतेचे वडील आले.

सीतेला कांहींतरी घाणेरडा गुप्तरोग असला पाहिजे, हें कानीं पडतांच तिचे वडील बावरून गेले. तिच्या नवऱ्याचेंच पत्र पाहतांच त्यांना त्यांत कांहींतरी तथ्य असावें असें वाटूं लागलें. तिच्या सासूनें सांगितलें—आपल्या मुलीला आजच्या आज घेऊन चला आपल्या घरीं. आजपासून ती आम्हाला मेली असंच आम्ही समजतों.

सीतेचे वडील तिला आपल्या घरीं घेऊन आले. त्यांनीं सीतेला हडसून खडसून विचारलें. पण ती कांहींच उत्तर देईना.

तिच्या आईनेंही चौकशी केली पण कांहींच बोध होईना. सीतेला जेव्हां कळून आलें—आपल्यावर घाणेरडा आरोप ठेविला आहे—तेव्हां तिला अतिशय दुःख झालें.

सीता कांहींच कबूल करीत नाहीं असें पाहून तिचे वडील चिडले. एकुलती एक लाडकी मुलगी आणि तीही ' अशी ' निघावी याचें त्यांना मनस्वी दुःख होत होतें. संतापाच्या भरांत त्यांनीं तिला मारहाणही केली. पण सीता रडत रडत सांगत होती, " मी निष्पाप आहें हो! मला अशी छळूं नका! "

शेवटीं अब्रूला धक्का लागू नये म्हणून तिच्या वडिलांनीं तिला डॉक्टरकडे न्यायचें ठरविलें. गावांतल्या इतर डॉक्टरकडे जाण्यापेक्षां हॉस्पिटलच्या सर्जनकडे गेल्यानेंच आपली अब्रू बचावेल असें त्याना वाटलें. ते सीतेला घेऊन सर्जनकडे गेले.

त्यांनीं सर्व हकीकत ऐकून घेतली आणि सीतेकडे पाहून मिस्किल हास्य केलें. सीता त्यांच्याकडे सारखी टक लावून पहात होती. डॉक्टरना तिच्या चेहऱ्यावर लज्जेची एकही रेषा दिसली नाहीं.

" मिस्टर, तुमची मुलगी मोठी धीट दिसते हं. हाच जर मुलगा असता तर किती बाणेदार शोभला असता! " डॉक्टर मोठ्यानें हंसत म्हणाले.

सीतेच्या वडिलांनीं एक उसासा सोडला. स्वतःला मुलगा नाहीं याची जाणीव डॉक्टरच्या शब्दांनीं होऊन त्यांना त्याचा विषाद वाटला.

" तसं असतं तर आजची आपत्ती कशाला कोसळली असती माझ्या शिरावर? " ते दुःखाने उद्गारले.

डॉक्टर सीतेला घेऊन आंत गेले. सुमारें पाऊण तास ते सारखी तपासणी करीत होते. मधूनमधून सीतेला सारखे प्रश्न विचारीत होते.

बाहेर बसलेल्या सीतेच्या वडिलांची उत्सुकता सारखी वाढत होती.

डॉक्टर बाहेर आले आणि त्यांनीं सीतेच्या वडिलांना हळू हळू कांहीं सांगितलें. डॉक्टरनीं जें काहीं सांगितलें तें त्यांच्या चेहऱ्यावर हर्षाच्या रूपाने दिसत होतें.

दुसरे दिवशीं ऑपरेशन करायचें ठरलें. ऑपरेशन झालें. आणि डॉक्टर ऑपरेशन रूममधून बाहेर येऊन म्हणाले, " मिस्टर, तुमच्या सीतेचा सीताराम झाला! "

मिस्टरांच्या चेहऱ्यावर आनंद झळकला.

" त्याचं असं आहे ! " डॉक्टर म्हणाले, " क्वचित् अशा केसीस घडतात मधून मधून. स्त्री आणि पुरुष यांमधें दोन्ही जातींचे स्वभावधर्म असतातच पण कांहीं व्यक्ति अशा असतात कीं ती स्त्री असली तर कालांतरानें पुरुष होते आनि पुरुष असली तर स्त्री होते. पुष्कळ वेळां ऑपेरशन केलं नाहीं तर हें परिवर्तन दिसून येत नाहीं. हेंच उदाहरण घ्याना. सीतेचं ऑपरेशन केलं नसतं तर जन्मभर ती स्त्रीच्या देहांत पण पुरुषाच्या मनांत राहिली असती. मनानं ती पुरुषच राहिली असती. नवऱ्याविषयीं आकर्षण वाटत नव्हतं; आनि स्त्रियांविषयीं आकर्षण वाटत होतें तिला ; याचं कारण हेंच--"

ऑपरेशनमधून बरं वाटल्यावर सीतेनें न्हाव्याला बोलावून आणलें. आपल्या डोक्यावरचा केशसंभार उतरवला आणि पुरुषासारखे केस ठेविले. ती आतां पुरुष वेषांत राहूं लागली होती. पुरुष वेषांतील एक फोटोही तिनें काढून घेतला.

दुसरे दिवशीं आपला फोटो, बुचडा आणि मंगळसूत्र यांचे पार्सल करून तें तिनें [ नव्हे त्यानें ] आपल्या नवऱ्याच्या नांवावर पाठवून दिलें.

---

# बंडखोर मन १८

आणि आतां झटून अभ्यास करायचा, परीक्षेंत पास व्हायचें असें दिनकरनें नक्की ठरविलें. त्यानें अभ्यासासाठीं एक स्वतंत्र खोलीही घेतली. खोली पुस्तकांनी चांगली सजविली. इतर सर्व सामान नीट-नेटकें लावलें, आणि तो अभ्यासाला बसला.

पण आठ दिवस झाले तरी पुस्तकाचें एक पानही वाचून झालें नाहीं, एक ओळही त्याच्या स्मरणांत राहिली नाहीं. आपल्याला हें असें काय होत आहे हें त्याला समजेना. तो अगदीं सुन्न होऊन गेला.

सारखें झोंपून राहावें, झोपेंत सारखा विचार करावा असें त्याचें चाललें होतें.

इंटरच्या परीक्षेंत नापास होण्याची त्याची ती चौथी खेप होती- त्याच्या बरोबरीचे विद्यार्थी एव्हांना आपला अभ्यासक्रम संपवून उद्योग-धंद्याला लागले होते. कांहीं हुशार विद्यार्थी तर त्याच्याच कॉलेजांत फेलो-प्रोफेसर होऊन आले होते.

याची त्याच्या मनाला लाज वाटत होती, खंत वाटत होती; पण त्याचा कांहीं इलाज चालत नव्हता, वार्षिक परीक्षा येई आणि जाई. आणि दिनकर मात्र होता तिथेंच होता. तो अभ्यास करीत असे; पण अभ्यासाला राहण्यासाठीं त्याच्या डोक्यांत जागाच नव्हती. त्याला तो काय करणार ?

या वर्षी तो नापास झाला. तेव्हां त्याच्या वडिलांनीं त्याला

बजाविलें, " आणखी एक वर्ष तुला चान्स देत आहें; याही वर्षी नापास झालास तर घराबाहेर हांकलून देईन. " वडिलांचें हें वाक्य दिनकरच्या डोक्यांत सारखें घोळत होतें. त्यानें त्याचें अंतःकरण दुखावलें होतें. त्या दिवशीं तर त्याच्या वडिलांनीं घर डोक्यावर घेतलें होतें. सारा दिवस त्यांनीं दिनकरला मनसोक्त बोलून घेतलें. त्यात आपल्या पत्नी-लाही दोष दिला. तिच्याच लाडानें तो बिघडला आहे असेंही त्यांनीं बोलून दाखविलें.

त्यानंतर लगेच दुसऱ्या दिवशींची गोष्ट. दिनकरच्या आईनें त्याच्या वडिलांजवळ गोष्ट काढली, कीं ' दिनकरचें आतां लग्न करून द्या, त्याशिवाय त्याचं लक्ष लागायचं नाहीं अभ्यासाकडे. वयही झालं आहे त्याचं —'

" तर तर, मोठी शहाणी आलीय् शिकवायला ! " ते बोलले, " या घोड्याला पोसतों आहें नि लग्न करून देऊन त्याच्या बायको पोरांनाही पोसूं? एक दिडकी मिळवायची नाहीं धमक अंगीं, नि कशाला याला लग्न हवं ? लोकांच्या पोरी अशा वर नाहींत आलेल्या. अशा आयतोबांना पोरी देण्यापेक्षां त्या पोरींना विहिरींत ढकललेल्या बऱ्या. "

" खरं आहे तुमचं म्हणणं. पण त्याच्या बायकोला पोसण्याला महाग का आहोंत आपण ? सारं कांहीं त्याचंच ना ? नि शिवाय असं नको का पहायला ? "

" काय ? "

" त्याचं आतां वय झालं आहे. ज्या वयांत ज्या गोष्टी झाल्या पाहिजेत त्या नकोत का व्हायला ? या वयांत तुम्हाला मूलही झालं होतं–"

त्यांच्या डोळयांत हास्य चमकलें. ते मिशींत हंसूंही लागले.

" ती परिस्थिती निराळी होती—"

" नि त्यावेळीं तुमचे वडीलच नव्हते का पोशीत आम्हाला ? त्यांनीं नव्हतं असं कधीं चुकून म्हटलेलं—"

" अग तो काळ निराळा होता. आज या बैलोबाचं मी लग्न लावून दिलं तर तोंडांत शेण घालतील लोक माझ्या. "

"मला कांहीं कळत नाहीं. पण इतकं कळतं, ज्या वयांत ज्या गोष्टी झाल्या पाहिजेत त्या झाल्याच पाहिजेत— पोर कसा सुकून गेला आहे.—कसं अभ्यासांत मन रमेल त्याचं? मॅट्रिकपर्यंत कसा भराभर पास होत गेला?—"

"छे! छे! तें कांहीं नाहीं. तुझ्या आपल्या भलत्याच कांहीं कल्पना आहेत. भलतंच कांहीं बोलूं नकोस. त्यानं ऐकलं तर तो आणखीन् शेफारायचा."

आणि दिनकरनें त्यांचें बोलणें ऐकलें होतेंही. आईनें आपलें अंतःकरण ओळखलें याचा त्याला आनंद झाला. आणि वडिलांच्या बेपर्वाईनें त्याला विषाद वाटला.

आईच्या विनवणीनें त्याच्या वडिलांनीं एवढेंच आश्वासन दिलें कीं, 'यंदा पास झाला तर पाहूंया पुढील वर्षी.'

या सर्व प्रकारामुळे दिनकर आपल्या आयुष्याला कंटाळून गेला. त्याचें मन कुठेंच रमेना. आतां निदान शेवटचा प्रयत्न तरी करून पहावा म्हणून तो अभ्यासासाठीं स्वतंत्र जागा घेऊन राहिला.

आज अभ्यासाला बसला असता त्याच्या डोक्यांत हेच विचार घोळत होते. अभ्यास करायचा, पहिल्या वर्गात नाहीं तर निदान दुसऱ्या वर्गात तरी पास व्हायचें. आणि—आणि—आणि—

त्यानें खूप खूप निश्चय केला. अभ्यासाची अगदीं जय्यत तयारी केली. साऱ्या नोटस्, प्रश्नोत्तरें वगैरे साहित्य आणून ठेविलं.

परंतु प्रत्यक्ष अभ्यासाच्या वेळीं एक ओळही त्याला समजत नव्हती. कोणता विषय आपण वाचीत आहों याचा त्याला भ्रम होई. त्याचें चित्त असं भ्रमण करीत असे त्यामुळें तो बावरून जाई. आणि अशा वेळीं त्याच्या मनाचा गोंधळ होई.

अभ्यासावर लक्ष लागण्यासाठी त्यानें पांच पांच मिनिटानें चहा ढोसण्याचा क्रम चालू ठेविला. स्वतःची निर्भत्सना करण्यासाठीं आपल्या समोर एक भला मोटा आरसा लावून ठेविला.

पण रामा शिवा गोंविदा.

तो त्रासून जाई. आणि असा त्रासला म्हणजे तो बाहेर डोकें शांत करण्यासाठीं जाई. रेक्लमेशन, मलबार हिल, कुलाबा या बाजूला डोकें आणि मन शांत करण्यासाठीं एकटाच फिरे; पण तेथें मन शांत होण्याऐवजीं तें अधिकच भडके. त्यामुळें तो चिडे.

खोलीवर तो परत येई तो चिडलेल्या स्थितींत. आणि मग तो सारा राग आपल्यावर काढी. आरशासमोर उभा राहून तो आपल्या तोंडांत मारून घेई. मन शांत होण्यासाठीं मनाचे श्लोक वाची. पण जों जों तो मनाला आटोक्यांत आणण्याचा प्रयत्न करी तों तों तें अधिकच बंडखोर होई.

अशा बंडखोर मनाला शिक्षा करणें त्याच्या हातची गोष्ट नव्हती. तो आपल्या देहाला शासन करूं शके, पण मनाला मारणें त्याला शक्य होत नव्हतें.

आणि आज रात्रीं दहाच्या सुमारास तो बाहेरून फिरून आला तो अशा मन:स्थितींतच.

त्यानें खोलीचें कुलूप काढलें. दरवाजा जोरानें लोटला. आणि आरामखुर्चीवर अंग टाकलें. डोकें सुन्न होऊन गेलें होतें. स्वत:वर चिडण्याचेंही त्याला त्राण राहिलें नव्हतें. तो अगदीं अगतिक झाला होता. खोलींत दाट अंधकार होता. बत्ती पेटविण्याचें त्याला सुचत नव्हतें. आणि त्याला काळोखच यावेळीं प्रिय होता. काळोखांत बसून तो सारखा विचार करीत होता. त्याला आपल्या भवितव्याची निराशा वाटत होती. या वर्षीही पास होऊं अशी खात्री वाटत नव्हती. उलट नापास होण्याचीच खात्री वाटत होती.

साडेदहा वाजून गेले. सर्वत्र सामसूम झालें होतें. क्वचित् जाणाऱ्या येणाऱ्या गाड्यांचा आवाज कानीं पडत होता. आकाशांत चंद्रमा तळपत होता. त्या पांढऱ्याशुभ्र चांदण्यांत मुंबईतील इमारतींचे झेंड जणुं

बुडून जात होते. एकाद्या तेजोवलयाप्रमाणें आजूबाजूला शोभा आली होती.

दिनकरची बाहेर दृष्टी जातांच त्याचें हृदय भरून आलें. त्या चांदण्याच्या शीतल छत्राखालीं जाऊन पडावें अशी अनिवार इच्छा त्याला होऊं लागली. तो एकदम उठला आणि खोलींत येरझारा घालूं लागला. क्षणभरानें तो आपल्या खिडकीपाशीं उभा राहून बाहेरील शोभा पाहूं लागला.

या वेळीं अकरा वाजण्याचा सुमार झाला होता. दिनकरनें समोर पाहिलें. समोर दूर कोठेंतरी उंच घरांत दिव्यांची आकर्षक रोषणाई केलेली आहे. त्या दिव्याच्या झगझगीत प्रकाशांत कांहीं आकृतींची हालचाल अस्पष्ट दिसून येत होती.

आणि कांहीं वेळानें त्या बाजूनें येत असलेले गण्याचे गोडस्वर ध्वनि त्याच्या कानांवर येऊन आदळूं लागले.

रात्रीच्या त्या प्रशांत वातावरणांत ते सुस्वर पांखरासारखे स्वैर फिरत होते.

दिनकरचें अंतःकरण त्या गाण्याच्या स्वरांनीं भरून आलें.

हळू हळू ते ध्वनि जास्त स्पष्ट ऐकूं येऊं लागले. मधून मधून ‘ वाहवा ’ चे सादही ऐकूं येऊं लागले.

त्यामुळें दिनकर बेचैन झाला. तो व्याकूळ झाला. त्याचे डोळे त्या दूरवर दिसणाऱ्या इमारतीमधील रोषणाईवर खिळून राहिले.

एकाद्या मंत्रमुग्धाप्रमाणें तो खोलीबाहेर पडला आणि त्या इमारतीच्या अनुरोधानें चालूं लागला.

आणि त्या इमारतीपाशीं येऊन दाखल झाल्यावर जेव्हां तेथील पहारेकरी भय्यानें त्याला लवून सलाम केला तेव्हां तो भानावर आल्यासारखा झाला.

भय्यानें त्याला वरच्या दरवाजापर्यंत नेऊन पोंचविलें आणि आंत जाऊन बसण्यास सांगितलें.

दिनकर वर जाऊन पोंचला आणि खिडकींतूनच जें दृश्य त्याच्या दृष्टीला पडलें त्यानें तर तो वेडावूनच गेला.

त्या भव्य दिवाणखान्याचा कोपरान् कोपरा उजेडानें चमकत होता. दिवाणखान्यांत रसिक मंडळी एकाद्या चित्रांतील माणसांसारखी तटस्थ बसली होती. मध्यें एक मोठी उंच बैठक केली होती. आणि त्या बैठकीवर एक वीस वर्षांची अप्सरा नृत्य करीत होती–गात होती. तिच्या बाजूला बसलेली मंडळी वाद्यांनीं तिला साथ करीत होती.

तिला पाहून दिनकर देहभान विसरून गेला. तिच्या प्रत्येक हालचालीबरोबर त्याच्या अंतःकरणाची व्यथा वाढूं लागली आणि तो आंत जाऊन केव्हां बसला हें त्याचें त्यालाच कळलें नाहीं.

ती नृत्यांगना गात होती. नृत्य करीत होती.

आकाशांत मेघांची दाटी झाली होती. ते कृष्णमेघ एकमेकांवर आपटून मोठा गडगडाट होत होता. आणि त्यांच्या हालचाली मोठ्या उत्सुकतेनें व्याकुळतेनें पहात मोर पाण्याविना व्याकुळ झाला होता. तो मोठ्या आशेनें वर पहात होता. मेघ नाचूं लागले कीं, तोही आपला भव्य पिसारा पसरवून नाचूं लागे, आणि ते थांबले कीं तो करुण दृष्टीनें त्यांच्याकडे पाही. आणि एकदाचे पावसाचे थेंब खाली पडले–त्याच्या उघड्या चंचूमध्यें त्यांतील कांहीं पडले—तेव्हां त्याचा अंतरात्मा संतुष्ट झाला.

आणि त्या आनंदभरात मोर आपला भव्य पिसारा फुलवून नाचूं लागला. आपल्या प्रेयसीला साद घालूं लागला.

अशा अर्थाचें तें गाणें होतें. त्या गाण्यांत जे भाव व्यक्त होत होते. त्याबरहुकूम ती हावभाव करीत होती. तिनें मोराची भूमिका घेतली होती. आणि मोराप्रमाणें तीही नाचत होती. मोराला पाणी मिळतांच तो नाचूं लागला, तेव्हां तिनें जें नृत्य केलें त्यानें जमलेल्या मंडळींचीं अंतःकरणें भरून गेली. आणि ती समेवर येतांच सर्वांनीं एकदम शाबाशीची टाळी दिली.

आणि त्यानंतर ती जें नृत्य करीत होती त्यानें जमलेल्या रसिक मंडळीचा तोल सुटल्यासारखें झालें. नादाच्या भरांत ते पुढें पुढें सरकूं लागले. कांहीं जण तर उठून उभे राहिले. त्यांनीं 'वाहवा,' 'खाशी' म्हणून मध्येंच विक्षेप करण्यासही कमी केलें नाहीं.

तिच्या नृत्याला सारखे 'वन्समोअर' मिळत होते. वाहवा, शाबास यांना तर ऊत आला होता.

आणि एका "शाबाशी" चा आवाज ऐकून दिनकर चमकला. त्यानें बाजूला वळून पाहिलें. आणखी त्याच्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला.

नृत्यांगनेच्या प्रत्येक हालचालीकडे अनिमिष नेत्रांनीं पहात, मान डोलावीत असलेले त्याचे वडीलच तेथें प्रत्यक्ष होते.

दिनकर निमुटपणें बाहेर पडला. जिन्याच्या पायऱ्या उतरून तो खालीं आला. तेव्हां पहाऱ्यावरील भय्यानें त्याला हटकलें आणि चिरीमिरीसाठीं हात पुढें केला. पण त्याच्याकडे त्याचें लक्षच नव्हतें.

——————

# शेजारची मुलगी : १९

जगूच्या खोलीचें दार सताड उघडेंच होतें. मी खोलींत प्रवेश करीत करीत मनांत म्हटलें–लेकाच्याला शुद्धबुद्ध आहे कीं नाहीं, खुशाल दार उघडं टाकून जायचं म्हणजे काय ? कुणी आंत शिरून काहीं लांबवलं तर ? खोली म्हणजे कांहीं तरुणाचं हृदय नव्हे असं उघडं टाकायला !

मी जगूच्या खोलींत शिरलों आणि टोपी काढून कॉटवर भिरकावून दिली आणि जगूच्या खोलीचें निरीक्षण केलें. खोलींत सारी अव्यवस्था दिसत होती. कॉटवरील चादर चुरून गेली होती. उशी त्रिशंकूसारखी लोंबकळत होती. खुंटीवरचे कपडे कांहीं खालीं पडले होते. खोलींत ढोपरभर केर सांचला होता. त्यांत सिगारेटचीं थोटुकें आणि जळक्या काड्या यांचीच संख्या जास्त होती. पाण्याचा खुजा फुटून पाणी चोहीं-कडे पसरलें होतें. खुर्चीनें भूमीला पाठ लावली होती, ती त्याच स्थितींत पडून होती.

मी खुर्ची नीट केली. तिच्यावर आसन ठोकलें आणि विचार करूं लागलों—जग्याची आज काय अवस्था झाली आहे ही ! खोलीची ही अवदसा कां करून ठेविली आहे त्यानें ? डोक्यांत राख कां घालून घेतली आहे त्यानें !

टेबलावरही तोच प्रकार. बारा वाजण्याचा वेळ होत आला होता तरी टेबल लँप अजून जळतच होता. पुस्तकें एकमेकांवर पडलीं होतीं. युद्ध होऊन गेल्यावर कांहीं वेळानें तेथें माणसांचीं प्रेतें ज्या अवस्थेंत पडलेलीं दिसतील त्याच अवस्थेंत पुस्तकें पडलीं होतीं. टेबलावर कांहीं

कागद अर्धवट लिहिलेले दिसत होते —त्यांतील कांहीं खालीं जमिनीवर पडले होते.

मी टेबलावरचा एक कागद हातीं घेतला आणि वाचूं लागलों. त्यावर जगूच्या हस्ताक्षरांत पेन्सिलीनें लिहिलें होतें.

होइल होइल वाटत होतें
तेंच अखेरिस झालें
नांव घेतल्यावाचून आतां
मनांत झुरणें आलें

अरेरे! काय बेस्याला झालें हें! आज काव्याची लहर आली वाटतं ? अं ? हा दुसरा कागद कसला आहे ?—

जिवन्मृताला हवा कशाला
हा असला हव्यास ?

काय झालंय् तरी काय याला ? कुठें प्रेमभंग तर झालेला नाहीं याचा ? खास असंच कांहींतरी दिसतंय् प्रकरण ! पण दाद लागूं दिली नाहीं कधीं जगूनें ! आंतल्या गांठीचा लेकाचा ! सांगितलं असतं तर काय मसणांत गेला असता ? मला कांहीं तरी करतां आलं असतं तर नाहींका प्रयत्न केला असता मी ? आता मर म्हणावं. '**होइल होइल वाटत होतें !**' वाटत होतें तर प्रेम करायला गेलास कशाला ? झक मारायला ?

माझ्या मनांत असे विचार सारखे येऊं लागले. जगूच्या बाबतींत असाच कांहीं तरी प्रकार झाला असला पाहिजे असा मला संशय येऊं लागला आणि हा संशय अगदीं खरा असणार असेंही वाटूं लागलें. आणि त्यामुळें मी अगदीं अस्वस्थ झालों. जगू माझा जिवाभावाचा दोस्त होता. कित्येक वर्षें आम्हीं एकत्र राहिलों होतों. आमचें शिक्षण एकत्रच झालेलं. गेल्याच वर्षी माझें लग्न झाल्यामुळें मी निराळें बिऱ्हाड करून राहूं लागलों होतों. इतक्यांतच तो प्रेमांत पडलेला असावा. मी एवढा जिवाभावाचा मित्र पण त्यानें दाद लागू दिली नाहीं मला. जिवाभावाच्या मित्राजवळही ज्यांची परिस्फुटता करतां येत नाहीं असं कांहीं तरी असतं आणि त्याचं नांव प्रीति, हें आज मला कळून आलं.

मी कळवळ्याचा एक उसासा सोडला आणि खालीं पाहूं लागलों. खालींही कसला तरी एक कागद पडलेला होता. मी तो उचलून घेतला. त्यांत लिहिलें होतें त्यानें.

केल्या ज्याच्या पायघड्या मी
तुझ्या स्वागतासाठीं !
त्या हृदयाला तुडवुन गेलिस
भलत्या थाटापाठीं !

मी ते सारे कागद टेबलावर ठेवून दिले आणि एक पुस्तक उचललें. पुस्तक उघडलें तेव्हां आंतून एक पत्र खालीं पडलें. पत्र वाचूं का नको याबद्दल मला विचार पडला नाहीं. मी पत्र वाचूं लागलों. त्यांत पुढील मजकूर होता:

" जगूराव, आपण मित्र आणि मैत्रीण म्हणून एकत्र खेळलों-फिरलों. पुष्कळ मित्रमैत्रिणी असें करतात. पण त्यावरून त्यांनीं एकमेकांशीं लग्नच केलं पाहिजे असं नाहीं ! तुम्ही तरी तशी अपेक्षां कां करतां ? तुमच्याबरोबर लग्न करावं असा विचार चुकून सुद्धां कधीं माझ्या मनांत आला नाहीं. आणि तुमच्याबरोबर लग्न करायला माझा तसा विरोध आहे असंही नाहीं. पण हें पहा जगूराव, मला तुम्हीं आज इतकीं वर्षे पहातांच आहां. माझ्यासारखी उधळी मुलगी तुम्हाला परवडेल का ? अगदीं सत्य सत्यच सांगतें-- तुमचा पगार माझ्या पावडर स्नोला देखील पुरायचा नाहीं. मग तुमच्या मागणीला मी नकार दिला तर त्यांत नवल काय ? "

पत्राच्या खालीं सही नव्हती.

जगूच्या मनःस्थितीचा मला उलगडा झाला. त्यानें हें पत्र जिवाला लावून घेतलेलें दिसतें. खोलीचें दार असें सताड उघडें टाकून तो असा गेला कुठें याचा मला विचार पडला. मला शंका आली—कुठें आत्महत्त्या करायला तर गेला नसेल ? प्रेमभंग झाला म्हणून आत्महत्त्या करणारे अनेक वीर असतात. आमचा हा प्रेमाचा वीरही असेंच कांहीं करणार नाहीं ना ?

माझें मन थरारलें. उठून त्याच्या शोधाला जावें असें वाटूं लागलें. पण पायच उचलेनात. मी मनांत म्हटलें—जगू भावना-प्रधान आहे—असं कांहीं जिवाचं बरं वाईट करायचा देखील. त्याचा कांहीं नेम नाहीं. बाकी ही पोरगी सरळ आणि व्यवहारी हं! खरं खरं तें सांगून टाकलं तिनें. उगाच आडपडदा ठेवला नाहीं.

—स्त्री जातीचें व्यवहारी तत्त्वज्ञान जणूं तिच्या तोंडून निघालें आहे. मला तिचें कौतुक वाटलें.

पण तिचें कौतुक करायची ती वेळ नव्हती. माझ्या जगूच्या आयुष्याचा तो प्रश्न होता.

त्याचा शोध करण्यासाठीं बाहेर निघायचें मी ठरविलें.

मी उठलों आणि बाहेर जाण्यास निघालों इतक्यांत समोरून जगू झिंगल्यागत येत असलेला दिसला.

मी दारांत उभा राहिलों आणि त्याच्याकडे पाहूं लागलों. केंसाच्या झिंजोट्या झालेल्या, शर्टाच्या बाह्या तशाच उघड्या, हातांत धोतराचा सोगा धरून येत असलेला जगू पाहून मला त्याची दया आली. प्रेम-भंगानें हा जीव फुकट जाणार कीं काय असें वाटूं लागलें मला.

जगू सरळ आंत आला.

अंगांतला कोट काढून दूर भिरकावून देऊन त्यानें कॉटवर अंग टाकलें.

आणि तो एकाद्या अजाण मुलीसारखा ओक्साबोक्शीं रडूं लागला.

त्याच्याजवळ जाऊन त्याचें सांत्वन करावें असें मनांत आलें. पण मी संयम केला. रडण्यानेंच त्याचें दुःख कमी होईल असें वाटलें मला.

जगू सारखा रडत होता.

या कुशीवरून त्या कुशीवर तळमळत होता.

कांहीं वेळानें मी त्याच्याजवळ जाऊन त्याच्या पाठीवरून हात फिरविला. माझ्या हाताचा स्पर्श होतांच त्याच्या डोळ्यांतून पाणी वाहूं लागलें.

आम्ही कुणीच कांहीं बोललों नाहीं. तोही आतां रडायचा थांबला होता. मधून मधून उसासे सोडीत होता इतकेंच.

इतक्यांत कुणीतरी दारावर आल्याचा भास मला झाला. मी पाहिलें—एक लांब शेपटा सोडलेली, गोल नेसलेली तरुण मुलगी तेथें उभी होती. केंसाचा शेपटा डाव्या खांद्यावरून छातीवर घेऊन ती त्याच्याशीं हाताचा चाळा करीत होती. काळी सांवळीच होती. पण तिच्या चेहऱ्यावरील कडा मला इतक्या आकर्षक वाटल्या कीं तिच्याकडे पहातच राहिलों.

तिनें विचारलें, " किती वाजले हो ? "

" पाऊण ! " मी

" असं ? " तिनें उद्‌गार काढला. आणि जगू झोंपला होता त्याच्याकडे अशा आविर्भावानें डोकावून पाहिलें, आणि त्यावेळीं तिच्या कानांतील लोलकांची अशी कांहीं मजेदार हालचाल झाली कीं मला त्याची गंमत वाटल्यावाचून राहिली नाहीं.

" काय झालं त्यांना ? झोंपले कां ? कांहीं आजारी बिजारी आहेत वाटतं ? " तिनें विचारलें.

" छे ! आजारी नाहीं कांहीं. थोडं बरं नाहीं वाटत. अं-ऽडोकं दुखतं आहे जरासं ! " मी कांहींतरी उत्तर दिलें.

" मग बामबिम आणून देऊं का ? "

" नको, नको, कशाला. तसं कांहीं नाहीं ! "

मी तिला उत्तर द्यायच्या आधींच ती आपल्या घरीं जाऊन बामची बाटली घेऊन आली सुद्धां.

" घ्या ! " तिनें बामची बाटली माझ्याकडे देत म्हटलें.

" कायरे, जगू, बाम पाहिजे का ? "

" नकोरे बुवा छळूं मला असा. बाम नको नि बीम नको. मला जरा पडूं दे थोडा वेळ स्वस्थ ! " जगूनें मोठ्यानें उत्तर दिलें.

त्या मुलीनें ओंठांचा चंबू केला आणि थोडासा वाईट चेहरा करून तेथून ती निघून गेली.

" जग्या, तुला कांहीं अक्कल आहे कीं नाहीं ! सौजन्य म्हणून

कांहीं पदार्थ आहे याची तुला आठवण आहे का ? किती वाईट वाटलं त्या मुलीला तुझ्या तुसडेपणानं —"

"अरे, आहे ठाऊक वाईट वाटलं तें. बघशील आतां पुनः पिंगा घालीत येईल थोड्या वेळानं—"

आणि खरोखरीच इतक्यांत ती आली देखील.

"कायहो, टाइम्सचा अंक आहे का ? जरा रेडिओचा कार्यक्रम बघणार होतें—"

मी मुकाट्यानें उठून टाइम्स तिच्या हवालीं केला.

ती निघून गेली.

"पाहिलस, अश्शी छळते आहे मला." जगू म्हणाला, "जें हवं तें मिळत नाहीं नि नको तें पाठीशीं लागत असतं !"

मी मोठ्यानें हंसलों.

नंतर हळू हळू जगूनें आपली प्रेमकहाणी मला तुटक तुटक शब्दांत सांगितली. त्यानें सांगितली म्हणण्यापेक्षां जिनें त्याचा प्रेमभंग केला तिचीं पत्रेंच त्यानें माझ्यापुढें ठेवलीं आणि मला विचारलें, "आतां सांग, मी कां जिवंत राहावं, कुणासाठीं रहावं कशासाठीं रहावं !"

"निदान आतां आलेल्या त्या शेजारच्या मुलीसाठीं तरी जिवंत रहा तूं जगू !" मी थट्टेनें म्हटलें.

तेव्हां तो एकदम उसळला.

"पवित्र विषयाची अशी थट्टा करणं चांगलं नाहीं. कुठं ती न् कुठं ही कशाला कांहीं पत्ता ?"

"पण ती तुला मिळते आहे कुठं ? ही मात्र तुला मिळेल !"

"प्रेम हा पदार्थ तुला माहीत नाहींसा दिसतो !"

"आहेरे माहीत, तुझ्यापेक्षां माहीत आहे. म्हणूनच सांगतों कीं तें प्रेम गेलं. आतां या मुलीवर प्रेम कर अन् जगांत जिवंत रहा. आयुष्यांतील आनंद उपभोग !"

"हं. शक्य नाहीं तें. आजन्म अविवाहित राहीन—"

मी त्याच्या तोंडावर हात ठेविला आणि त्याला गप्प केलें.

त्या दिवशीं मी तेथेंच राहायचें ठरविलें. जगूचें चिन्ह ठीक दिसत नव्हतें. म्हणून मी त्याच्याच खोलींत मुक्काम ठोकला.

दुपारीं मी त्याच्या कॉटवर जरा आडवा पडलों. जगू टेबलाशीं बसून कांहीं लिहीत बसला होता.

थोडावेळ झोंप घेऊन मी जागा होऊन पाहिलें तों जगू खोलींत सारख्या येरझाऱ्या घालीत असलेला मला दिसला.

पिंजऱ्यांत कोंडून ठेवलेला सिंह जसा या बाजूपासून त्या बाजूपर्यंत सारखा येरझारा घालीत असतो तसा तो फिरत होता. त्याचा चेहरा काळवंडून गेला होता. डोळे खोल गेले होते. दाढी वाढली होती. त्यामुळे चेहरा अधिकच भेसूर दिसत होता. कांहीं तरी निश्चय तो करीत आहे असेंच वाटत होतें.

मला त्याची दया आली. त्याच्यासाठीं काय करावें हेंच मला सुचेना. मी आपला कॉटवर पडून त्याच्याकडे पहात होतों.

संध्याकाळ होऊन काळोख पडूं लागला तरी आम्ही आपले मुकाट्यानें राहिलों होतों. या दरम्यान ती शेजारची मुलगी दारावर किती तरी वेळां येऊन गेली असेल पण तिच्याकडे जगूचें लक्षच नव्हतें. तिनें त्याच्याशीं बोलण्याचा प्रयत्न केला तेव्हां तर जगूनें दरवाजा खाडकन् बंद करून घेतला. त्यावेळीं त्याच्या चेहऱ्यावरील भेसूरता मला अधिकच जाणवली. मात्र दरवाजा खाडकन् बंद केल्यानंतर हळू हळू त्याच्या चेहऱ्यावरील भेसूरता कमी कमी होत गेली. आणि त्याचे डोळ विलक्षण चमकूं लागले. माझ्या मनांत विचार आला—आत्महत्त्या करण्यापूर्वी माणसाचे डोळे असेच चमकच असतील काय? जगूचे डोळे तसेच असतील का?

मला त्या डोळ्यांची भीति वाटली.

मी त्याच्या डोळ्यांकडे पुन: पुन्हा पाहूं लागलों. तों ते अधिकच उज्वल दिसूं लागले. डोळ्यांतील दाहकता कमी कमी होत जाऊन

ते जणुं हंसत आहेत असें वाटूं लागलें. दाहकता आणि हास्य हीं दोन्हीं एकाच वेळीं दिसूं लागल्यामुळें त्यांत कारुण्य भरून दिसूं लागलें.

आणखी थोड्या वेळानें मी पाहिलें-त्याच्या डोळ्यांत मला विलक्षण मोहकता दिसूं लागली. त्याचा चेहरा विलक्षण व्याकुळ दिसूं लागला. त्याचे डोळे थेट पुंडरिकासारखे दिसूं लागले.

मला त्याची दया आली. तो आतां खुर्चीवर बसून छताकडे दृष्टी लावून सारखा पहात होता.

इतक्यांत टेबल लॅम्प गेला. खोलींत काळोख पडला. मी खिडकी-बाहेर पाहिलें–बाहेरील दिवेही गेले आहेत. इलेक्ट्रीसिटीचें कनेक्शनच तुटलें होतें आणि सर्वत्र अंधार पसरला होता.

जगूच्या अंत:करणांतही असाच अंधार दाटला होता.

यावेळीं खोलीचें दार ठोठावलें गेलें आणि जगूनें दार उघडलें.

ती मुलगी आंत आली.

" अहो, काड्याची पेटी जरा देतां का? बत्त्या गेल्या ना!"

जगूनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. मात्र त्याचे डोळे त्या अंधःकारां-तही चकाकत होते.

" अन् या अंधारांत काय बसून राहिलां? कंदील नाहीं का? थांबा हं मी आणतें जाऊन."

ती कांहीं वेळानें कंदील घेऊन आली.

टेबलावरील पेटी घेऊन तिनें कंदील पेटविला.

कंदीलाचा प्रकाश जगूच्या तोंडावर पडला.

त्याचे डोळे तळपत होते.

जगूकडे पहातांच ती चमकली. तिनें कंदील खालीं ठेविला. ती त्याच्या तोंडाकडे सारखी पहात राहिली.

जगूचे डोळे तिच्या डोळ्यांशीं जणुं बोलत होते. त्याच्या तोंडावर आतां स्मितही चमकूं लागलें.

" आतां बरं वाटतं म्हणायचं तुम्हांला!" ती हंसून म्हणाली.

" हं!" हा आवाज जगूचा होता.

जगूनें कंदिलाची वात बारीक केली. आणि —

पण ती केव्हांच दरवाजापर्यंत जाऊन पोंचली होती.

जगू तिच्या पाठोपाठ धांवत जाऊन म्हणाला, " डोकं दुखतंय् जरा बाम देतां का ? "

" थांबा हं, आणतें जाऊन ! "

इतक्यांत इलेक्ट्रीसिटीचें कनेक्शन जुळलें.

खोलींत आणि बाहेर चक्क प्रकाश पडला.

आणि रस्त्यावरून कुणाची तरी वरात चालली होती तिचा बॅंड वाजूं लागला.

बॅंडचा सुस्वर कानीं पडतांच जगूनें दरवाजा बंद केला. आणि त्या तालावर तो नाचूं लागला.



# कुतुबमिनार : २१

सकाळीं सहा साडेसहा वाजतां पेशावर एक्सप्रेस दिल्ली स्टेशनांत येऊन उभी राहिली. थंडी कडाक्याची पडली होती. हवा गार गार सुटली होती. स्टेशनच्या प्लॅटफॉर्मवर आम्ही थंडींत कुडकुडत उभे राहिलों होतों. हमाल आमचें सामान आणून बाहेर टाकीत होते.

इतक्यांत कुणीतरी साहेबी पोषाख केलेला तरुण आमच्याकडे लगबगीनें येऊन शुद्ध मराठींत म्हणाला, " मिस्टर, तुमच्या बॅगेची किल्ली देतां का आम्हाला ? "

त्याची दृष्टी सामानांत पडलेल्या आमच्या बॅगेकडे होती.

" प्रवासांत बॅगेची किल्ली कुठं हरवली आमच्या–नि आतां घोटाळा झालाय्–महत्त्वाचं सामान त्यांत राहिलेलं ! "

मी माझ्या खिशांतून माझ्या बॅगेची किल्ली काढून त्याच्या स्वाधीन केली.

" थॅंकस् ! " करीत तो घाईघाईनें निघून गेला. माझा मित्र मला हंसत हंसत म्हणाला, " किल्ली हरवणं एकंदरीत वाईटच नाहीं ? "

" कुणीतरी आपलाच—महाराष्ट्रीय दिसतो. ओळख केली पाहिजे. प्रवासांत आयती सोबत होईल—"

" पाणी मुंबईचं दिसतंय्— "

आमचें असें बोलणें चाललें आहे इक्यांत तो इसम एका तरुणीसह तेथें येऊन दाखल झाला.

त्यानें किल्ली माझ्या हातांत परत देऊन आभार मानले.

त्या तरुणीला पाहून आम्ही दोघे स्तिमितच झालों. एकाद्या सिनेमा नटीसारखी ती दिसत होती. तिची उंच गौरवर्ण देहयष्टी, सफेत रंगाचें काळ्या किनारीचें रेशमी पातळ, मानेवर सैल सोडलेला आंबाडा, सरळ नाक आणि सतेज डोळे पाहून माझ्या मनाला विलक्षण आनंद वाटला. स्त्री सौंदर्याची ती म्हणजे एक रेखींव प्रतिमाच होती जणुं.

मी माझा मित्र रजनीकात याच्याकडे पाहिलें. त्याच्या डोळयांत निराळीच चमक मला दिसली.

एकदम कांहीं तरी आठवल्यासारखें करून तो उद्गारला:

" मिस् कुसुम अंबिके ? "

त्या तरुणीनें मृदुहास्य केलें. ती म्हणाली, " अं हं ! मिसेस मराठे ! "

आणि पुनः ती तोंडभर हांसली.

रजनीकांतानें त्या तरुणाकडे सहेतूक दृष्टीनें पाहिलें, तेव्हां ती पुनः हंसून म्हणाली, " हे माझे मित्र मि. ठोमणे ! "

" आम्ही दिल्ली आग्रयाच्या प्रवासाला निघालों आहोंत. आपली अचानक गांठ पडली हें ठीक झालं ! " मि. ठोमणे बोलले.

" तुम्ही दिल्लींत कुठं उतरणार आहांत ? " मी विचारलें.

" महाराष्ट्र समाजांत—" मि. ठोमणे यांनीं उत्तर केलें.

" नि तुम्ही कुठं ? तिथंच बहुतेक ? " मिसेस मराठे.

" नाहीं. आम्ही येथल्या पोतदारांचे पाहुणे म्हणून आलों आहोंत. त्यांच्या घरीं उतरणार."

" ठीक. मग भेटूंच तिथं. बरोबरच जाऊं शहर पाहायला—"

" अच्छा ! "

सामानसुमान घेऊन आम्हीं स्टेशन बाहेर आलों. गाडींत बसल्या-बर आम्हीं दोघे बोलायला लागलों. मिसेस मराठे आणि मिस्टर ठोमणे यांची गाडी आमच्यापुढें जात होती.

" कोण रे ही ! तुझी ओळख कुठली ?" मी रजनीकांतला विचारलें.

" अरे ती माझी क्लासमेट. साठे मास्तरांच्या मॅट्रिकच्या क्लासांत आम्ही होतों. त्यावेळीं ती मिस् अंबिके होती आतां ती मिसेस मराठे झालीय. पण त्यावेळची कुसुम नि आतांची कुसुम यांत केवढं अंतर! त्यावेळीं ती एक बावळट पोरगी होती. आतां एकाद्या सिनेमा नटी सारखी दिसते. "

" हें कसं काय झालं ? "

" काय जाणे ! तिलाच विचारलं पाहिजे. त्यावेळीं तिच्या तोंडावरची माशी उडत नव्हती. आतां कशी फडाफड बोलते. एकदां काय झालं. आमचा क्लास सुटला होता. मुलं घरीं जायला बाहेर पडत होतीं. ही सर्वांच्या आधीं बाहेर पडून रस्त्यावर आली. कशाला तरी पाहून घाबरली ती. नी धांवत माघारीं आली. आम्हां मुलांच्या मध्यें घुसून थरथर कांपत राहिली. आम्हीं तिला सांवरून धरली—बांकावर बसविली. नंतर तिला सोबत करून बाहेर आणली.

बाहेर रस्त्यांत एक धटिंगण पठाण उभा होता. तिच्या भीतीचें कारण तेंच होतें.

तेव्हां आमची तर हसूनहसून मुरकुंडी वळली.

आणि निर्भयता आल्यामुळें तीही मग हंसूं लागली. अगदीं गरीब मुलगी. घरीं आईबाप होते. पण बाप पक्का दारूबाज. चांगली नोकरी होती पण सारे पैसे ब्रँडीच्या बाटलींत जात होते. रिकाम्या बाटल्या विकून कधीं कधीं त्यांना आपल्या गरजा भागवाव्या लागत. आमच्या वर्गांत येणाऱ्या साऱ्या मुली कशा नटून थटून यायच्या. कुसुमला अंगभर चांगलेसें पातळही नेसायला मिळत नव्हतं. मग दागदागिनं कोठले? तिचं दैन्य इतर मुलींच्या भपक्यानें उठून दिसायचं. यामुळंच आम्हांला तिच्याबद्दल सहानुभूती वाटे. सहानुभूती वाटे म्हणूनच आम्ही तिची वारंवार चौकशी करीत असूं. घरांत पोटभर अन्न खायला नसे. बापाच्या हातचा पोटभर मार मात्र मिळे. कल्पना कर, बरोबरच्या विद्यार्थिनी रोज नवे नवे शृंगार करायच्या, रोज सिनेमा नाटकाला जायच्या, हवे तसे पैसे खर्च करायच्या, त्यावेळीं तिच्या मनाची कशी तळमळ चाललेली असेल!

ती चेहऱ्यावर कांहीं दिसूं देत नसे. पण अंतरींच्या यातना लपून कशा राहतील ? उदासपणें दिसून येत. आम्हाला तिच्याबद्दल कळवळा येई."

रजनीकांत तिची हकीकत सांगत होता इतक्यांत बर्न बॅस्टन रोडवरील आमचें निवासस्थान आलें.

मिसेस मराठे मि. ठोमणे यांचा हात धरून खालीं उतरत होत्या. त्यांना महाराष्ट्र समाजांत जायचें होतें.

आम्हाला समाजाच्या पुढें जरा उतरायचें होतें.

आम्हाला पुढें जातांना पाहून त्या दोघांनीही आनंददर्शक हास्य केलें.

आम्ही महाराष्ट्र समाजाचे पोतदार यांच्या निवासस्थानीं येऊन दाखल झालों.

दुसरे दिवशीं सायंकाळीं आम्हीं कुतुबमिनार पाहायला गेलों. आमच्या बरोबर मिसेस मराठे याही होत्या. अर्थात मि. ठोमणे होते हें सांगायलाच नको.

कुतुबमिनारच्या आसपासचे प्राचीन स्तूप, मोडकळीस आलेले जुने राजवाड्याचे अवशेष वगैरे प्रेक्षणीय स्थळें पाहून आम्हीं कुतुबमिनारच्या पायथ्याशीं येऊन दाखल झालों.

तो अजस्त्र स्तंभ पाहून आमची छाती फाटून गेली. त्याच्या ऐतिहासिक दंतकथा आमच्या वाटाड्यानें आम्हाला सांगायला सुरवात केली.

नंतर आम्हीं वर जाण्यासाठीं निघालों.

मिस्टर ठोमणे म्हणाले, "आपण कांहीं बुवा वर येऊं शकत नाहीं. मला आहे हार्टडिसीझचा विकार. पटकन् कोसळून पडायचा शेंकडों फुटावरून खालीं. मी आपला येथील देखाव्यांचे फोटोच घेत बसतों. तुम्ही वर जाऊन पोंचलां कीं तुमचा तिघांचाही फोटो घेतों इथून. पण तुम्ही वर किती दिवसांनीं जाऊन पोंचणार तें सांगून ठेवा हं !—"

वर चढून जाण्याची त्यांना छाती होत नव्हती हें आम्ही ओळखलें. आपली भीति विनोदाच्या पांघरुणाखालीं ते लपविण्याचा प्रयत्न करीत होते.

आम्ही पायऱ्या चढूं लागलों.

जसजसे आम्हीं वर जाऊं लागलों तसतसा मार्ग अरुंद होऊं लागला. आपण गुदमरत आहों कीं काय असें वाटूं लागलें. थोडी भीतीही वाटूं लागली मनांत. मिसेस मराठे यांना तर हाताला धरून न्यावें लागत होतें.

कांहीं क्षण मोठ्या उत्सुकतेंत गेले.

आणि जेव्हां का आम्ही वर येऊन घुमटीखालीं उभे राहिलों तेव्हां मोकळ्या हवेनें आणि आजूबाजूच्या देखाव्यानें आमचीं मनें ताजींतवानीं आणि प्रसन्न झालीं.

तेथून दिल्ली शहराचा भव्य विस्तार दिसत होता. ज्या आठ दहा निरनिराळ्या शहरांनीं मिळून दिल्ली बनलेली आहे तीं एकमेकांत कशीं मिसळून गेलीं आहेत तें दिसत होतें. तेथून यमुना नदीचें विस्तीर्ण पात्र दिसत होतें.

त्या देखाव्यानें मिसेस मराठे खूष होऊन गेल्या. आणि कबूतर जसें इकडून तिकडे फिरत घुमत असतें तशा त्या घुमटाच्या चारी दिशांना फिरत होत्या. गुणगुणत होत्या. त्या मध्येंच उद्गारल्या, "किती छान!"

"पृथ्वीराजाच्या राजकन्येनं उगाच नाहीं तो बांधला! यमुना नदीचं रोज दर्शन व्हावं म्हणून तिनं हा मिनार बांधून घेतला म्हणतात. कुतूबनं नंतर त्यांत दुरुस्ती करून आपलं नांव दिलं.—" मी म्हटलें.

"एका राजकन्येच्या लहरींतून ही कालाकृति निर्माण झाली आहे–" रजनीकांत म्हणाला.

"राजकन्येची लहर नाहीं ही रजनीकांत!" मिसेस मराठे म्हणाल्या; यावेळीं त्यांचा चेहरा तेजानें तळपत होता, "कोंडलेल्या मनाची ती उच्च आकांक्षा होती. पतंगाप्रमाणं उंच उंच आकाशांत स्वैरविहार करण्याची सर्वांचीच इच्छा असते. पण सारेच पतंग कांहीं उंच जाऊं शकत नाहींत. बहुतेक दोरी तुटून पडतात. माणसांची

तशीच स्थिति असते. कडेकोट बंदोबस्तांत राजकन्येच्या मनाचा कोंड- मारा झाला होता. तिला मोकळ्यावर भटकण्याची अनिवार हौस होती. आपली हौस तिनं अशा रीतीनं पुरविली असेल—"

रजनीकांतनें सांगितलेल्या हकीकतीवरून मिसेस मराठे यांच्या अंतरंगाची मला कल्पना आलीच होती. त्यामुळें त्यांच्या उद्गारांत स्वत:च्या मुक्या मनाचे कढ दिसून येत आहेत असें मला वाटलें.

" राजकन्येनं जीवनांतल्या उच्च सुखाचा उपभोग घेतला. " त्या पुढें म्हणाल्या, " कदाचित् या मिनारवर बसून ती, यमुना नदींत संके- तस्थळीं विहार करणाऱ्या आपल्या प्रियतमाचं दर्शनही घेत असेल—"

मिसेस मराठे यांच्या चेहऱ्यावर आनंदाचें तेज चमकत होतें त्यावेळीं.

" कुसुमताई, माफ करा ! " रजनीकान्त मधेंच म्हणाला," तुमचं जीवनही असंच असेल का ? मी वर्गांत तुम्हांला पाहिलं त्यावेळीं तुम्हीं कशा दिसत होतां नि आतां कशा दिसतां ! केवढं स्थित्यंतर झालं तुमच्यांत—तुम्हांला तुमच्या उच्च आकांक्षा साध्य झालेल्या दिसतात—"

" खरं आहे तें—मी एक वेडी-अजाण मुलगी होतें तेव्हां. तें द्ररिद्री जीवन. मनाच्या साऱ्या भुका कशा अतृप्त राहिल्या होत्या. पोटाची भूक-वासनांची भूक-एक बौद्धिक भूक मात्र तृप्त होत होती माझी—"

कांहीं क्षण त्या स्तब्ध राहिल्या.

. यावेळीं सूर्याचीं मावळतीं कोवळीं किरणें त्यांच्या मुखावर पसरून तेथें गुलाबाची शोभा आली होती.

" ऐकण्याची इच्छा आहे वाटतं ! " त्यांनीं हंसून आमच्याकडे पाहून विचारलें.

आम्ही दोघांनीही एकदम म्हटलें, " हं ! "

" रजनीकांत, तुम्हाला माहीतच आहे त्यावेळची माझी परिस्थिति. ज्याच्या मनाच्या उड्या मोठ्या असतात अशा माणसांची स्थिति अशा- वेळीं अत्यंत केविलवाणी असते. माझंही असंच झालं होतं. वेणींत घाला-

यच्या चार आंकड्यांनाही महाग होतें. मग कपड्यालत्त्यांची नि दागदागिन्यांची गोष्ट तर बोलायलाच नको. वाईट वाटे. पण कांहीं उपाय नव्हता. या सर्वांची उणीव मी अभ्यासांतील हुशारीनं भरून काढण्याचा प्रयत्न करीत असें. पण परीक्षेची फी भरायला पैसे नाहींत म्हणून मला त्यावर्षी मॅट्रिकच्या परीक्षेला बसतां आलं नाहीं. एक वर्ष घरीं बसून काढलं.

दुसऱ्या वर्षी एक मोठा चमत्कारिक योग आला. माझ्या वडिलांना पैशांची लालूच दाखवून एका वयातीत गृहस्थानं मला मागणी घातली. मी सोळा सतरा वर्षांची तर तो पन्नाशीच्या घरांत असलेला. तो निपुत्रिक, निराधार असा पेन्शनींत निघालेला कस्टम अधिकारी होता.

मी त्याच्याबरोबर लग्न करायचं ठरविलं. त्याच्या वैभवाकडे पाहून वयाकडे दुर्लक्ष केलं. हें तर खरंच. मात्र लग्नाला कबूल होण्यापूर्वी त्यांना मी कांहीं अटी घातल्या.

मी त्यांना सांगितलं—मी शिकेन तेवढं मला शिकूं द्यायचं, मी म्हणेन ती माझी हौस पुरवायची नि मी जशी वागेन तसं मला वागायला द्यायचं. कुणाबरोबरही बोललें फिरलें वा हिंडलें तरी त्याबद्दल त्यांनीं मुळींच तक्रार करायची नाहीं कीं मला वाईट वाटेल असं वागायचं नाहीं.

त्यांनीं माझ्या साऱ्या अटी कबूल केल्या.

माझं त्यांच्याशीं लग्न झालं.

मी वैभवांत नांदूं लागलें.

युनिव्हर्सिटीचे सारे शिक्के माझ्यावर बसले.

लोक माझ्याकडे आदरानें पाहूं लागले.

माझ्या पतींनी माझ्या कोठल्याही गोष्टींत ढवळाढवळ केली नाहीं. त्यांच्याशीं माझं लग्न झालंय् पण आम्हीं सोबतीनं अशी कधीं कुठंच हिंडत फिरत नाहीं. मी त्यांची पत्नी आहे याचाच त्यांना आनंद. आज मी एकटी वाटेल तिथं जातें, वाटेल तिथं फिरतें. माझ्या अनेक मैत्रिणी आहेत तसे मित्रही आहेत.

आतां या कुतुबमिनारवर चढल्यावर जसं प्रसन्न असं वाटतं तसंच

माझं मन माझ्या आकांक्षा पुऱ्या झाल्यामुळं प्रसन्न वाटतं मला. माझ्या जीवनांत थोर चरित्र आढळणार नाहीं तुम्हांला पण माणसाचं अंतःकरण दिसेल खास!"

बोलतां बोलतां त्यांचा आवाज सद्‌गदित झाला.

यावेळीं सूर्य मावळून गेला होता.

आम्ही भानावर येऊन कुतुबमिनारच्या पायऱ्या उतरूं लागलों.

———

# त्यांनीं वेडेंच राहायचें ठरविलें ! : २२

वठलेल्या वृक्षासारखी दाजीबांची स्थिति झाली होती. पुराण वृक्षाचा संभार हळूहळू नाहींसा व्हावा—त्याचीं हिरवीं पर्णे, शाखा सुकून जावींत, त्यांवर वास्तव्य करणारीं पाखरें दुसऱ्या ठिकाणीं उडून जावींत आणि त्याची दैना व्हावी, तसेंच दाजीबांच्या बाबतींत झालें होतें. सारी हयात मोठ्या वैभवांत घालविली. तें वैभव गेलें. मुलांबाळांनीं आणि इष्टमित्रांनीं गजबजलेलें त्यांचें घर उघडें पडलें. आणि त्या उजाड घरांत एकटें राहाण्याचा प्रसंग त्यांच्यावर आला.

यामुळें त्यांचें धैर्य खचून गेलें. उमेद नाहींशी झाली. साठीच्या घरांत प्रवेश करतांना ज्या मुलांबाळांचा आधार त्यांना काठीसारखा व्हावयाचा तीच नाहींशीं झालेली. अशा स्थितींत त्यांचा जीव, देहा-मधून बाहेर पडण्यासाठीं सारखा घुटमळत होता. आणि लोकांना आतां वाटत होतें—कीं दाजीबा आतां तग धरून राहणार नाहींत फार दिवस. पण जुनाट वृक्ष झंझावातांतही टिकून राहिलेला आपण पहातों. तसेंच दाजीबा इतकीं संकटें कोसळूनही जिवंत राहिले होते. पण अनेक झंझावातांत टिकून राहिलेला वृक्षही एकादे वेळीं अचानक कोसळून पडलेला पाहातोंच कीं नाहीं आपण. दाजीबाही असेच केव्हां तरी गेलेले दिसतील एकादे दिवशीं.

त्या रिकाम्या घरांत एकाद्या समंधासारखे ते एकटे वावरत होते. खाणें पिणें तर त्यांनीं सोडूनच दिलें होतें. कधीं लहर आली तर दोन

घास ते खात असत; पण तेही कुणी शेजाऱ्यांनीं आणून दिले तर, ज्या ओटीवर रोज वीसपंचवीस माणसें बसून असायचीं, तेथें आतां एकटे दाजीबाच सदा बसलेले असायाचे. एका जुनाट तक्क्याला टेकून ते सारा दिवस असायचे. त्यांच्या चेहऱ्यावर आतां वृद्धत्वाचीं सारीं चिन्हें दिसत होतीं. पण प्रतिकूल परिस्थितिबरोबर झगडून चेहऱ्यावर जें एक विजयाचें चिन्ह दिसत असतें तें अजूनही नाहींसें झालें नव्हतें. मात्र त्यांचें पूर्वींचे चकाकणारे डोळे आतां कारुण्यानें ओथंबलेले दिसत होते. ते रडत नव्हते. पण त्यांचे डोळे जणुं अश्रुपात करीत आहेत असेंच पाहाणाराला वाटे.

त्यांच्या दारांतून जाणारीं माणसें त्यांच्याकडे सहानुभूतीचा एक दृष्टिक्षेप टाकून पुढें जात असत. कुणी त्यांना क्वचित् हांकही मारीत. पण ही हांक त्याना ऐकूं येईच असें नाहीं. ते आपले सदा विचारांत असत. कधीं हांक ऐकूं आलीच तर त्यांच्या जीर्ण चेहऱ्यावरील रेषा अधिक जवळ येऊन स्पष्ट दिसत. अशा वेळीं ते किंचित् हास्य करीत आहेत असा भास होई. मात्र ते खरोखरच हास्य करीत आहेत असें कुणालाच नक्की सांगतां आलें नसतें. प्रशांत सरोवराच्या पृष्ठभागावरील तरंग कुणी पाहिले आहेत काय? सकाळीं-दुपारीं—संध्याकाळीं—केव्हांही तुम्ही पहा. दाजिबा आपले तेथें बसलेले तुम्हाला आढळले असते. आणि कधीं कधीं उत्तर रात्र होऊन गेली तरी ते तक्क्याला टेकून बसले आहेत असें आढळून आलें असतें. दिवसाचा वेळ अशा रीतीनें ते कसाबसा घालवीत असत. पण रात्र पडली कीं त्यांच्या दुःखातिरेकाला भरती येत असे. त्यांनीं अशा किती तरी रात्रीं पापणीला पापणी न लावतां जागून काढल्या असतील. अगदीं बेचैन जीव झाला म्हणजे ते घरांत सारख्या येरझारा घालीत फिरत. दिवस आणि रात्र त्यांना दोन्हींही सारखींच होतीं. अशा येरझारा घालीत ते राहिले म्हणजे केव्हांच उजाडे आणि पुनः ते आसनावर येऊन बसत.

रात्रंदिवस त्यांचें चित्त अस्वस्थ होऊन राहिलें होतें. त्यांना शांति अशी क्षणभरही मिळत नव्हती. आणि तिच्यासाठीं तर त्यांचा जीव

कासावीस होत होता. सर्व दु:खांचा विसर पाडायला लावील अशी एकादी वस्तु ते शोधत होते. पण ती त्यांना मिळत नव्हती.

शेवटीं दूरच्या एका नातलगाकडे जाऊन तरी राहावें म्हणून ते कोकणांतून मुंबईला येऊन दाखल झाले.

परंतु मुंबईला येण्यांत चूक केली असें त्यांना पहिल्याच दिवशीं आढळून आलें. त्यांचा नातलग मोठा श्रीमंत होता. वैभव त्याच्या घरांत वावरत होतें. मुलांबाळांनीं घर कसें गजबजून गेलें होतें. तें पाहून त्यांना आपल्या गतवैभवाची आठवण होई. मुलाबाळांची चिंवचिंव ऐकून, त्यांच्या क्रीडा पाहून त्यांना आपल्या मुलांबाळांची आठवण होऊं लागली.

आणि त्यामुळें तेथें त्यांचें दु:ख शतपटीनें वाढूं लागलें. इतरांच्या सुखांत समाधान मानून राहाण्याची त्यागवृत्ति त्यांच्यांत राहिली नव्हती. त्यांनीं अनेक डॉक्टरांचीं औषधं घेतलीं, पण त्यांचें चित्त स्थिर होत नव्हतें. समाधान शांति यांचा एक क्षणही त्यांच्या वांट्याला येत नव्हता.

दिवसेंदिवस ते अधिकाधिक अस्वस्थ होऊं लागले.

कुणी तरी त्यांना सांगितलें—' आतां देवधर्म, प्रार्थना, यांत वेळ घालवा. मग चित्त स्थिर होईल.' त्याप्रमाणें ते रोज नेमानें देवळांत जाऊं लागले. कथाकीर्तनें ऐकूं लागले. पण त्यांतही त्यांचें चित्त रमेना. कथाकीर्तनांतील कौटुंबिक कथा त्यांच्या अंत:करणाची व्यथा वाढवूं लागल्या. त्यामुळें मुंबईचा त्यांना वीट आला. आतां तर ते जास्तच भ्रमिष्ट होऊं लागले. त्यांच्या वागण्यांत वेडगळपणाही दिसूं लागला. तेव्हां कुणीतरी सुचविलें—दाजिबा आतां तुम्ही एकाद्या तीर्थाच्या ठिकाणीं जाऊन रहा, म्हणजे तुमच्या अंत:करणाला समाधान मिळेल. कुणी कांहीं सांगेल त्याप्रमाणें करायचें अशी बालवृत्ती आतां दाजिबांच्या ठिकाणीं दिसूं लागली होती. त्यामुळें तीर्थक्षेत्रावर जाऊन तरी पहावें, म्हणून त्यांनीं नाशिकची वाट धरली.

दाजिबा नाशिकला आल्यावर एक खोली घेऊन राहिले. परंतु त्यांचा सारा वेळ गोदातटीं देवालयांत जाई. तेथील धार्मिक वातावर-णाचा परिणाम त्यांच्या मनावर थोडाबहुत होऊं लागला. पण हा परि-

णाम दोनचार दिवसच टिकला. पुनः येरे माझ्या मागल्या. त्यांचें मन तेथेंही रमेना. मात्र रोज सायंकाळ देवदर्शनाला जाण्याचा नेम त्यांनीं सोडला नव्हता.

त्यांच्या चित्ताला मात्र शांतता नव्हती.

ते गांवांतून जाऊं लागले म्हणजे लोक त्यांच्याकडे आरंभाला उत्सुकतेनें पहात होते. कांहीं दिवसांनीं त्यांची उत्सुकता मावळून तिची जागा थट्टेनें घेतली.

दाजिबांचा तो बावळा वेष, वेड्यासारखी दिसणारी मुद्रा आणि चालतांना मधून मधून स्वत:शींच बोलण्याची, हातवारे करण्याची संवय, यामुळें लोकांची विनोदबुद्धि जागृत होऊं लागली.

आणि याचा परिणाम असा झाला कीं ते त्याची मधून मधून टवाळी करूं लागले. प्रथम या टवाळीकडे दाजिबांचें लक्ष नसे. पण कांहीं दिवसांनीं त्यांच्या लक्षांत हा प्रकार येतांच त्यांना वाईट वाटलें. लोकांचें आपण कांहीं नुकसान केलें नसतांना त्यांनीं टवाळी कां करावी, त्यांच्या थट्टेचा विषय आपण कां व्हावें, हेंच त्यांना समजेना. त्यांनीं आपल्या जाण्यायेण्याचा मार्ग बदलला. पण तेथेंही तोच प्रकार. उलट तो वाढतच आहे असें त्यांना आढळून आलें.

त्यांचें अंतःकरण त्यामुळें दुःखित झालें. ते विचार करूं लागले–मी मेलेल्यांतच जमा आहें–मेलेल्याला मारण्यांत यांना काय मिळणार आहे?

लोकांच्या टवाळींत गांवांतील मुलेंही सामील होत आहेत असें त्यांना आढळून आलें. मुलांचा व्रात्यपणा कोणत्या थराला जाईल हें सांगतां येत नसतें. आणि त्यांचें वर्तन अगदीं असह्य झालें म्हणजे दाजिबांना अत्यंत राग येई. चीड येई. कधीं कधीं त्यांचा प्रतिकार करावा असेंही त्यांना वाटे.

अलीकडे त्यांना हा एक नवीन विषय मिळाला होता विचार करायला. ते विचार करीत होते—या लोकांनीं मला असं कां छळावं?

आणि छळ जसजसा जास्त होऊं लागला तसा त्यांचा सारा वेळ या एकाच गोष्टीच्या विचारांत जाऊं लागला.

मात्र यामुळें त्यांना आपल्या दुःखाचा थोडा तरी विसर पडूं लागला.

ते स्वतांला एकच प्रश्न विचारीत होते—'या लोकांनीं मला म्हाताऱ्याला कां छळावं? स्वस्थ मरूं सुद्धां देत नाहींत.'

यामुळें त्यांच्या पूर्वीच्या भ्रमिष्ट स्थितींत आणखी भर पडली, पूर्वी क्वचित् स्वगत बोलणारे दाजिबा आतां वरचेवर स्वगत बोलतांना दिसूं लागले.

लोकांना वाटलें—म्हातारा खरंच वेडा आहे. आणि ते वेडे आहेत याची खात्री पटतांच मुलें त्यांचा अधिकाधिक छळ करूं लागलीं.

याचा परिणाम असा झाला—दाजिबा आतां भडकूं लागले होते.

या भडकण्यांत एक प्रकारचा कैफ आहे याची प्रचीति त्यांना पुढें येऊं लागली. आणि या कैफांत आपल्या मनाला समाधान वाटत आहे असेंही त्यांना आढळून येऊं लागलें. आणि जशी जशी त्यांची याबाबत खात्री होऊं लागली तसा या वृत्तींत त्यांना आनंद वाटूं लागला. एकादे दिवशीं कुणी त्यांच्याकडे फारसें लक्ष दिलें नाहीं तर त्यांना चुकल्या चुकल्यासारखें होऊं लागलें.

लहान मुले त्यांच्या पाठीशीं लागलीं कीं ते आतां त्यांना हस्तप्रसादही देऊं लागले होते.

लोकांना वाटलें—दाजिबा खरोखरच वेडे आहेत. ते त्यांची कुरापत काढून स्वतःची करमणूक करून घेऊं लागले.

दाजिबा मोठ्या लोकांचाही उद्धार करूं लागले. साऱ्या जन्मांत त्यांच्या तोंडून अपशब्द कधीं बाहेर पडला नव्हता. पण आतां त्यांच्या तोंडून शिव्यांची लाखोली वाहूं लागली. एकदां तर त्यांनीं फेंकलेला दगड एका लहान मुलाच्या डोक्याला लागून त्यांतून भळभळां रक्त वाहूं लागलें. दाजिबांना त्याबद्दल विलक्षण आनंद झाला.

घरीं गेल्यावर आतां त्यांना रात्रीं चांगली झोंप लागूं लागली.

त्यांनीं मनाशीं विचार केला—हें ठीक आहे! किती हलकं वाटूं लागलं आहे आतांशा.

त्या आनंदाच्या भरांत ते मोठमोठ्यानें गाऊंही लागले. तुकारामाच्या अभंगाच्या धर्तीवर ते अभंगही रचूं लागले. अर्थात् हे अभंग गांवांतील लोकांवरच असत. अभंगाचा शेवटचा चरण 'दाजी म्हणे' असा असायचा.

त्यांच्या वेडेपणामुळें ते राहात असलेल्या जागेच्या मालकाने त्यांना एके दिवशीं घरांतून हांकलून लावलें.

पण त्याबद्दल दाजिबांना कांहींच वाटलें नाहीं. एकवेळ त्यांच्या मनांत विचार आला—आतां आपल्या गांवीं निघून जावे. पण तो क्षणभरच. सध्यां आपल्या अंतःकरणाला जें अपूर्व समाधान मिळत आहे त्याचा त्याग न करणें हेंच चांगलें, आणि या उपर वेडेंच राहणें यांत शहाणपणा आहे असें त्यांनीं ठरविलें.

त्यांच्या प्रतिकाराच्या वृत्तीमुळें गांवांतलीं मुलें त्यांना आता भिऊन वागूं लागलीं. दाजिबा आला म्हटलें कीं रडतीं मुलें गप्प होऊं लागलीं. मोठीं माणसें टवाळी करीत, तींही आतां लपून छपून काय तें करूं लागलीं. अभंगांतून आपलें चरित्र बाहेर पडायचें अशी त्याना भीति वाटूं लागली होती.

त्यामुळें दाजिबा हेच गांवांतले राजे बनले. मनात येईल तें करावें असें आतां होऊं लागलें. ते आतां गांवांत कुठेंही फिरत. कुठेंही आणि कुणीही कांहीं दिलें तर खात आणि कुठेंही झोंपत.

त्यांचें मन आतां शांत झालें होतें.

—— ——

# नर्सचे अश्रु : २३

टेलिफोन रिसीव्हर त्याच्या हातून गळून पडला.

त्याच्या सर्वांगांतून जणूं वीज चमकून गेली. त्याच्या डोळ्या-पुढें झांपडी आली. भारावलेल्या अंतःकरणानें तो टेलिफोन रूम मधून बाहेर पडला.

टेलिफोन ऑपरेटरला वाटलें, साहेबांना कांहींतरी अनिष्ट बातमी कळली आहे. त्याच्या अगदीं निकट नात्याच्या माणसाला कांहींतरी बरें वाईट झालें असावे. म्हणून त्याने प्रभाकरला विचारलें सुद्धां, " साहेब, काय झालं ? कांहीं वाईट बातमी कळली का ? "

परंतु त्याला उत्तर देण्याच्या मनःस्थितींत प्रभाकर नव्हता. तो आपल्या खुर्चीवर जाऊन बसला. क्षणभरानें त्यानें आपले डोकें टेब-लावर टेकलें आणि तो विचार करूं लागला.

कालिंदी कोणत्या मनःस्थितींत असेल यावेळीं! तिचा जीव घाबरून गेला असेल. ज्याचा आनंद वाटला असता इतरांना, तें दुःख म्हणून मानण्याचें तिच्या नशिबीं आलें.

आणि याला कारण कोण, तर मी—मी प्रभाकर.

लग्नापूर्वी मूल झालेलें. आतां जग तिची विटंबना वाटेल त्या मार्गानें करील. कुणाचीही सहानुभूति तिला मिळणार नाहीं. आई नाहीं, बाप नाहीं, भाऊ नाहीं कीं बहिण नाहीं. जगांत आपलें असें म्हणायला तिला कोणीही नाहीं. ज्याचा आसरा मिळेल असें तिला कुणी नाहीं. उद्यां जगाला कळलें, कीं तिची नोकरीही जायची. आतां

कुणाच्या आधारावर तिनें जगायचें? ज्याच्या हातांत तिनें विश्वासानें मान दिली त्यानेंच--मी तिचा गळा कापला. प्रभाकर तूंच नाहीं का तिचा असा सत्यानाश केलास? तूंच नाहीं का तिचें प्रेम संपादन केलेंस, तूंच नाहीं का तिला लग्नापूर्वी वचनें दिलींस? तूंच नाहीं का...तूंच नाहीं का...?

प्रभाकराला हे विचार सहन होईनात. कालिंदीची असहाय स्थिती करायला कारण आपणच झालों आहों हें सत्य त्याच्या मनाला टोंचत होतें. त्याला ऑफिसांत बसून काम करणें अशक्य झालें.

त्यानें लगेच आपल्या साहेबाला पत्र लिहिलें कीं, अतिशय डोकें दुखत असल्यामुळें आज माझ्या हातून काम होत नाहीं. कृपा करून मला घरीं जाऊं द्यावें.

आणि प्रभाकर ऑफिसच्या बाहेर पडला तरी त्याच्या डोक्यांतील विचार नाहींसे झाले होते अशांतली गोष्ट नाहीं.

कालिंदीची करुणरम्य मूर्ती त्याच्या दृष्टीसमोर दिसत होती.

थोड्याच दिवसापूर्वी तिनें त्याला लिहिलें होतें:

"आतां माझी अब्रू आपल्या हातीं आहे. तुमच्यावर विश्वास टाकून मी वागले. त्याची फळें काय मीच भोगायचीं? लग्नाचं वचन देऊन शेवटीं असाच का गळा कापणार माझा? माझ्यासाटीं नाहीं तरी पोटांत असलेल्या आपल्या मुलासाठीं तरी माझ्याशीं लग्न करा. नाहीं पेक्षां वीष खावून मरण्याखेरीज मार्ग उरला नाहीं मला.

पत्र पोंचतांच मला भेटा.

अगदीं शपथ आहे माझी."

प्रभाकराच्या डोळ्यांसमोर त्या पत्रांतील अक्षरें दिसूं लागलीं. त्याला जणुं भीती वाटली त्या अक्षरांची.

त्याला आठवत होते—शिवण्याचीं यंत्रे विकण्याच्या दुकानावर त्याची आणि तिची एकदां गांठ पडली होती. आईसाठीं त्याला एक

मशिन घ्यायचें होतें. त्यापासून त्याची ओळख वाढत गेली आणि त्यानें तिला एके दिवशीं लग्नाचें वचनही देऊन टाकलें. कालिंदीला तिच्या स्वत:शिवाय जगांत कोणीही नव्हतें. दादरला एक खोली घेऊन ती राहात होती.

प्रभाकरचें तिच्यावर प्रेम होतें. पण त्याला आपलें प्रेम आपल्या आईवडिलांकडे व्यक्त करतां येत नव्हतें.

अशाच स्थितींत एक वर्ष निघून गेलें.

त्यानंतर जेव्हां कालिंदीकडून त्याला कळलें, कीं कालिंदी आतां एकटी राहिलेली नाहीं, तेव्हा त्याचा धीर खचूनच गेला.

आतां आपली बेअब्रू होईल. आपल्या घरीं कळलें तर आपल्याला घालवून देतील. चोहोंकडे आपली नाचक्की होईल.

आणि या भीतीनेच तो कालिंदीशीं लग्न करण्याचें पुढें ढकलीत होता—टाळीत होता. कालिंदीवर त्याचें अतिशय प्रेम होतें. पण प्रेम आणि अब्रू यांचा झगडा त्याच्या मनांत चालला होता. तो तिला भेटण्याचेंही टाळीत होता.

म्हणूनच तिचें पत्र आलें तेव्हा मनातून भेटायला जावें असें वाटत असूनही तो गेला नाहीं.

आणि त्यानंतर आज त्याला कळत होतें कीं, कालिंदी बाळंतीण झाली हॉस्पिटलांत म्हणून.

प्रभाकर अस्वस्थ झाला होता. आपण कुठें भटकत आहे हें त्याचें त्याला कळत नव्हतें. कालिंदीला जाऊन आतांच्या आतां भेटावें, तिला धीर द्यावा, तुला दगा देणार नाहीं म्हणून सांगावें असें त्याला वाटूं लागलें. त्यानें मनाशीं अगदीं निश्चयच करून टाकला कीं आतांच्या आतां जाऊन कालिंदीला हॉस्पिटलमध्यें भेटावें.

तो हॉस्पिटलच्या अनुरोधानें चालूं लागला.

हॉस्पिटलचा दादर चढतांना त्याचा श्वास कोंडूं लागला, त्याला गुदमरल्यासारखें होऊं लागलें.

त्यानें दरवाजावरील घंटेचें बटन दाबलें. तेव्हां एक साध्या वेषांतील नर्स बाहेर आली. तिनें विचारलें,

" काय हवंय् आपल्याला ? "

" कालिंदी श्रीमणी ! "

" कालिंदींची तब्येत ठीक नाहीं. आतां त्यांना भेटतां यायचं नाहीं. त्या झोंपल्या आहेत आता ! "

" पण मला भेटायचंच आहे त्यांना आतां ! "

" प्लीज एस्क्यूज् ! "

असें म्हणून तिनें दरवाजा बंद करून घेतला.

प्रभाकरला वाटलें तिनें मुद्दामच दरवाजा बंद करून घेतला. कालिंदीनेंच तिला सांगून ठेवले असलें पाहिजे कीं आपणाला आत घेऊं नकोस म्हणून. ती माझा भयंकर तिरस्कार करीत असावी. कां करूं नये तिनें ?

प्रभाकर अस्वस्थ मनानें परतला.

घरीं येत असताना तो निश्चय करीत होता. कांहीं वाटेल तें होऊं द्या. आतां आईला सारें सांगून टाकावें. माझ्या हातून चूक झाली. माझ्या चुकीसाठीं कालींदीचा बळी नको. मला आतां कालिंदीशीं लग्न केलेंच पाहिजे.

पण घरीं आल्यावर आईला समोर पहाताच त्याचा निश्चय डळमळला. त्याला धीर होईना. त्याची छाती धडधड उडूं लागली. त्याच्या तोंडातून शब्द फुटेना.

त्यानें आपल्या खोलींत जाऊन कडी लावून घेतली. बिछान्यावर पडून तो ओक्साबोक्सीं रडूं लागला ! कालिंदी, कालिंदी !

आईला सांगण्यासाठीं त्यानें सहा दिवस प्रयत्न केले. पण त्याला तें कांहीं जुळलें नाहीं. त्यामुळें त्याचा फारच कोंडमारा होऊं लागला.

तिला भेटण्याची इच्छा त्याला तीव्रपणें होऊं लागली. इतक्यांत ती आपल्या खोलीवर गेली असेल असें वाटून तिला घरींच गांठावी, तिची क्षमा मागावी म्हणून तो तिच्या खोलीवर गेला.

खोलीवर गेला तेव्हां कालिंदी कांहीं त्याला भेटली नाहीं. मात्र तिच्या खोलीचें कुलूप बाहेर राहून आपल्याकडे उपहासानें पाहात आहे असा त्याला भास झाला.

त्यानें शेजारीं चौकशी केली पण कुणालाच कांहीं माहिती नव्हती.

ती नोकरीवर असलेल्या दुकानांत जाऊन त्यानें विचारलें. तेथें त्याला कळलें, "मिसेस कालिंदीबाईनीं बाळंतपणासाठीं दोन महिन्यांची रजा घेतली आहे, रजा घेऊन गेल्यापासून त्यांच्यासंबंधीं कांहीं कळलेलें नाहीं."

त्यानें विचार केला, अजूनही ती हॉस्पिटलमध्येंच असावी. तिकडे जावें कीं जाऊं नये असा तो विचार करीत होता. उगाच अपमान नको असें त्याला वाटलें. पण तिला भेटण्याचीही उत्सुकता त्याच्या अंतःकरणात कांहीं कमी प्रबल नव्हती. अपमान झाला तर झाला, पण तिला भेटण्याचा प्रयत्न करायचाच असा दृढ निश्चय करून तो हॉस्पिटलकडे जाण्यास वळला.

त्याला दादर चढताना पाहून त्या दिवशींची नर्स घाईघाईनें त्याच्याजवळ आली आणि म्हणाली, "मि. सातघरे, थांबा हं या खोलींत जरा वेळ. मी आलेंच इतक्यांत!"

प्रभाकर निमूटपणें बाहेरच्या खोलींत बसून राहिला. त्याला जरा बरें वाटलें. ही नर्स परवां इतकी उद्धटपणानें वागली पण आज खुषींत दिसते. माझें नांवही तिला कळलेलं दिसतं. कालिंदीनें तिला सांगितलें असेल! एकंदरीत आजचा दिवस जरा बरा दिसतोय्!

प्रभाकर असा बराच वेळ विचार करीत बसला असतां ती नर्स आली. ती बाहेर जाण्याच्याच झोकांत दिसली.

"चला मिस्टर सातघरे!"

"कुठं बाहेर जायचंय्?"

"हं!"

"कालिंदी इथं राहात नाहीं?"

"हं!"

" मग कुठं ? आं ? बोलत कां नाहीं ? कुठं जायचं आतां ? "

" माझ्या घरीं ! "

" तुमच्या घरीं कालिंदी राहाते ? "

" हं ! "

प्रभाकरानें एक समाधानाचा उसासा सोडला. आणि तो नर्सच्या पाठोपाठ चालूं लागला.

तिचें घर जवळच होतें.

घरीं जातांच प्रभाकरला एका खुर्चीवर बसायला सांगून ती आंत गेली.

प्रभाकराच्या कानीं मूल रडल्याचा आवाज आला.

त्या आवाजानें त्याच्या अंगावर रोमांच आले. त्याला वाटलें, कालिंदीच्याच मुलाचा तो आवाज असला पाहिजे—आणि तें मूल माझंही पण, नाहीं का ?

या विचारानें त्याला चमकल्यासारखें झालें. तो नर्सची वाट पहात राहिला.

थोड्या वेळानें एका शुभ्र फडक्यांत गुंडाळलेलें मूल घेऊन नर्स बाहेर आली. ती थोडें हंसून म्हणाली, " मिस्टर प्रभाकर, हे आपले चिरंजीव बरं का ? हं. असे दचकूं नका ! आपलेच चिरंजीव ! "

प्रभाकर कांहीं बोलला नाहीं. त्याचा चेहरा खजील झाल्यासारखा दिसत होता.

नर्सनें मुलाला त्याच्या अगदीं तोंडाजवळ नेऊन विचारलें, " ओळख पटते का आपल्या माणसाची ? "

प्रभाकर त्यानें तर अगदींच ओशाळून गेला.

इतक्यांत मुलगाही रडूं लागला. त्याला थोपटीत नर्स एका खुर्चीवर जाऊन बसली.

प्रभाकर विचार करीत होता, अजून कालिंदी कां बाहेर येत नाहीं ?

पण ती कशी येईल ? बाळंतीण का कधीं बाहेर येत असते ? आपणच आंत गेलं पाहिजे !

त्याची सारखी चुळबुळ चालली होती. नर्स त्याच्या हालचाली कडे मोठ्या भेदक दृष्टीनें पाहात होती.

अखेर त्यानें उठून विचारलेंच, “ आपली कांहीं हरकत नसल्यास मी आंत जाऊन कालिंदीला भेटूं का ? ”

नर्स हंसली. पण त्या हसण्यांत खिन्नता, आणि उपहास भरलेलीं दिसलीं.

“ कालिंदी इथं नाहीं ! ” ती उत्तरली.

“ मग ? ”

“ ती आपल्या घरीं गेली ! ”

“ आपल्या घरीं गेली ? मी तर तिकडूनच येतों आहें. घराला कुलूप होतं तिच्या ! ”

“ आपल्या घरीं म्हणजे देवाच्या घरीं ! ! तेंच घर तिच्या सत्तेचं नाहीं का ? ” नर्सनें शांतपणें उत्तर दिलें.

प्रभाकर हबकल्यासारखा झाला.

त्याची जीभ लुली पडली. आपलीं गात्रें शिथील होऊन तीं आपल्याला सोडून जात आहेत कीं काय असें त्याला वाटूं लागलें.

तो मटकन् खालीं बसला.

त्याच्या डोळ्यासमोर अंधार आला.

डोळे पुशीत आणि दुःखावेग आवरीत त्यानें थोड्या वेळानें विचारलें,

“ काय झालं तिला ? ”

“ बाळंतपणांत फार त्रास झाला. तिसऱ्या दिवशीं फार ताप भरला नि—”

“ मला विचारीत होती का ती ? ”

“ नाहीं. चुकूनसुद्धां तिनं आपली चौकशी केली नाहीं ! ”

" माझ्यावर रागावली असेल ! खरोखर तिनं रागावायलाच पाहिजे ! पण मला कसं ओळखलं तुम्ही ? "

" आपल्या पराक्रमाची नोंद आमच्या हेड नर्सच्या रजिस्टरबुकांत आहे ना ! "

त्यानें थोड्या वेळानें पुनः विचारलें,

" कांहींच बोलली नाहीं का ती मरणापूर्वी ? "

" हो बोलली. एवढंच मला म्हणाली, माझ्या बाळाला तुम्हीच आतां सांभाळा. मीच तिच्या शेवटच्या सेवाशुश्रूषेला होतें. नि ती म्हणाली, मुलाचं नांव प्रभाकर ठेवा ! "

" काय प्रभाकर ठेवा ? असं म्हणाली ती ? " प्रभाकरानें हर्षभरित होऊन विचारलें.

" हो असंच म्हणाली ती ! "

" मग मला शेवटपर्यंत विसरली नव्हती ती तर ! कालिंदी, कालिंदी ! " प्रभाकर आतां मुक्तकंठाने रडूं लागला. " नि मी मात्र दुष्ट तिला भेटलों नाहीं. तिच्या आयुष्याचा सत्यानाश केला — "

इतक्यांत मूल रडूं लागलें.

प्रभाकरानें त्याच्याकडे उत्सुकतेनें पाहिलें. त्याच्या मनांत एकच विचार प्रामुख्यानें आला कीं, मुलगा थेट आपल्यासारखाच दिसत आहे.

त्याच्या दुःखी अंतःकरणांत समाधानाच्या ऊर्मि उसळल्या. तो आतां त्या मुलाकडे स्नेहार्द्र दृष्टीनें पाहूं लागला.

इतक्यांत मुलानें आपले चिमणे डोळे उघडून पाहिलें. प्रभाकराचें अंतःकरण वात्सल्यानें उचंबळून आलें. त्यानें पुढें होऊन नर्सच्या हातांतून मुलाला आपल्याकडे घेतलें.

आणि आवेगानें त्याला आपल्या छातीशीं बिलगून धरलें.

त्यानें नर्सला विचारलें, " माझा बाळ कुणासारखा दिसतो ? " नर्स हंसली. ती म्हणाली, " तुम्हां दोघांपासूनही त्यानं थोडथोडे गुण घेतले आहेत. "

प्रभाकराला नर्सचा सुवर्णमध्य पटला. कारण त्याचे डोळे अगदीं

थेट कालिंदीच्या डोळ्यासारखे दिसत होते त्याला. त्या डोळ्यांतून कालिंदीच जणुं आपल्याकडे पहात आहे असें त्याला वाटलें.

त्यानें मनाशीं निश्चय केला. आतां आकाश कोसळून पडलें तरी माझा निश्चय ढळायचा नाहीं. माझा बाळ माझ्याच घरीं राहिला पाहिजे. आई आणि बाबा यांच्या विरोधाला मी मुळींच विचारणार नाहीं. आतां एक क्षणभरही या सोनुल्याला मी विसंबूं शकत नाहीं !

तो नर्सला म्हणाला, " आम्ही चाललों आतां बाळाला घेऊन ! "

" कुठं ? "

" घरीं चाललों घेऊन. बाळ आतां आपल्या घरीं चालला ! "

प्रभाकर घरीं जाण्यास निघाला.

नर्स आपल्या डोळ्यांतील अवखळ अश्रु आवरण्याचा निष्फळ प्रयत्न करीत होती.

---

## कुत्र्याचें पोर : २४

बंडू शाळेंतून घरीं येत होता. साडेदहा अकरा वाजण्याचा सुमार होता. उन्हें कशीं कडक पडलीं होतीं. उन्हानें बंडू घामाघूम झाला होता. त्याचा चेहरा रातंब्यासारखा लाल लाल झाला होता.

अर्ध्या वाटेंत तो आला, तेव्हां एका आंब्याच्या झाडाखालीं सावलींत एक कुत्र्याचें पिल्लूं पडलेलें त्याला दिसलें.

बंडू थांबला. त्याची बालजिज्ञासा जागृत झाली. खालीं वाकून त्यानें त्याचें निरीक्षण केलें. त्याला हळूच हात लावून पाहिला.

त्याचें अंग त्याला मऊ मऊ वाटलें. बंडूच्या हाताचा स्पर्श होतांच त्या पिल्लानें आपले इवलेसे डोळे उघडले. बंडूकडे किंचित् पाहिल्यासारखें केलें. आणि आपल्या तोंडाची उघडझांक केली. जणुं तें कांहीं तरी बोललें असें बंडूला वाटलें. तें आपल्याला कांहीं तरी सांगत आहे असें बंडूला वाटलें.

ही कल्पना त्याच्या डोक्यांत येतांच त्याला सुखकारक अशा गुद-गुल्या झाल्या. त्यानें स्नेहानें त्या पिल्लाच्या पाठीवरून आपला हात फिरविला. त्या स्पर्शानें त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्या स्पर्शाबरोबर पिल्लानें अगदीं लहानसा आवाज केला. तो फक्त बंडुलाच तेवढा ऐकूं आला.

त्या आवाजाची बंडूला मोठी गंमत वाटली. तो त्याच्या शेजारीं

उकिडवा बसला आणि त्याला आंजारूंगोंजारूं लागला.

तें पिल्लूही बंडूला जास्त जास्त चिकटूं लागलें.

या वेळीं आंब्याच्या झाडाखालींही उन्हें येऊं लागलीं होतीं.

बंडूला मनांत वाटलें, "या उन्हांत हें पोर मरून जाईल! त्याला घरीं घेऊन गेलं तर?" ही कल्पना त्याला फार आवडली. त्याला त्यानें अलगद उचलून घेतलें. त्याला ऊन लागूं नये म्हणून आपली टोपी त्याच्या अंगावर घातली.

आणि बंडू घराकडे येऊं लागला.

तो घरात शिरला तेव्हां अगदीं घामाघूम होऊन गेला होता. त्याची आजी ओटीवर बसून माजरीच्या पिल्लाना खेळवीत बसली होती. ती बंडूचा अवतार पाहून म्हणाली, "हें रे काय बंडू, त्या घाणेरड्या पोराला कशाला आणलंस घरांत? चल टाकून दे त्याला!"

बंडूला आजीचा सल्ला कांहीं आवडला नाहीं. त्यानें कुत्र्याच्या पिल्लाला हळूच खालीं ठेविलें, आणि त्याला कुरवाळीत म्हटलें, "मी नाहीं जा! मला हवाय् तें! त्या मांजरीच्या पोरांना टाकून दे!"

आजीनें विचार केला. बंडू आपला हट्ट पुरा केल्याशिवाय रहायचा नाहीं. त्याच्या मनासारखें होऊं देणेंच योग्य आहे.

"त्याला घरांत घेऊं नको म्हणजे झालं. बाहेरच बाधून ठेव खांबाला." आजीनें मग सुचविलें.

बंडूनें त्याला पाणी आणून पाजलें.

पाणी पोटांत जातांच तें पोर सावध झालें. आणि थोड्या वेळानें बंडूच्या मागून इकडे तिकडे फिरूं लागलें. बंडूचा आनंद गगनांत मावेना. त्या पोराबरोबर तो नाचूं लागला.

आणि त्या दिवसापासून बंडूचा वेळ त्या पोराच्या अवतींभंवतीं जाऊं लागला.

तें बंडूला क्षणभर विसंबेना. बंडूला त्याच्याबरोबर खेळण्यांत

आनंद वाटूं लागला. त्याला एवढेंच वाईट वाटे–आजी कांहीं मांजरीच्या पोरांसारखें त्याच्यावर प्रेम करीत नाहीं.

तें शिवलें तर आजी आंघोळ करते, आणि मांजरीचीं पोरें मात्र तिच्या अंगाखांद्यावर खेळतात,—कुशींत झोंपतात, याचा त्याच्या मनाला विषाद वाटे. आपण त्यावर जशी माया करतों तशी आजीनेंही करावी असें त्याला वाटे. आजी असा पक्षपात कां करते हें त्याला कळत नसे. त्याला वाईट वाटे, आणि मग तो त्या पिल्लावर फारच माया करी.

तें पोर सहा महिन्याचें झालें तेव्हां फारच मोठें दिसूं लागलें. त्याची डौलदार मान, तपकिरी रंगाचें अंग आणि विलक्षण चपळाई पाहून बंडूला मोठा अभिमान वाटूं लागला. जणुं तें एकादें वाघाचें पिल्लूंच आहे असें बंडूला वाटूं लागलें.

त्यानें त्या पोराचें नांव वाघ्या असें ठेविलें. वाघ्याला आतां थोडें थोडें भुंकूं येऊं लागलें. तो थेट वाघासारखा ओरडतो असें बंडूला वाटे.

बंडू वाघ्याला घेऊन आतां बाहेर फिरायला जाई. पुढें बंडू आणि त्याच्या पाठीमागून वाघ्याची स्वारी असें दृश्य गावांत दिसूं लागलें. त्याला घेऊन बंडू नदीच्या कांठाकांठानें फिरे, नदींत मासे पकडणाऱ्या पक्षांना गलोलीमधून दगड मारी. त्यानें दगड मारला कीं वाघ्या कुत्रा दगड पडे तिकडे तीरासारखा धावे.

बंडू त्याला रानांतही घेऊन जाई. रानांत बंडू फळें पाडी, वानरांना दगड मारी. वाघ्या फळें पकडून आणी. झाडाझाडांवर फिरणाऱ्या वानरांना पाहून इकडून तिकडे सैरावैरां नाचे.

बंडू त्या दिवशीं असाच रानांत फिरत होता. त्यानें गलोलीमधून दगड मारण्यास सुरुवात केली. आंब्याच्या झाडावर आंबे कसे लालपिवळे दिसत होते. बंडूनें त्यांवर दगडांचा मारा सुरू केला.

आंबे पडले. पण आंब्याच्या झाडाखालील वारुळांतील सर्पाच्या

अंगावर एक आंबा पडला. आणि सर्प चवताळून फुस्स् फुस्स् करीत बंडूच्या अनुरोधानेंच धांवला.

बंडूची भीतीनें गाळण उडाली. सर्प आतां बंडूला येऊन डसणार इतक्यांत वाघ्यानें सर्पाला अडविलें.

सर्पाला वाघ्या पुढें जाऊं देईना.

त्याला तो मागेंही जाऊं देईना.

बंडू भीतीनें थरथरत तें दृश्य पहात होता.

कोणत्याच बाजूनें आपणाला जातां येत नाहीं असें पाहून सर्प चिडला.

तो वाघ्याच्या अंगावर धांवला.

पण वाघ्यानें त्याला आपल्या पंज्यांत पकडून त्याला फाडून टाकलें.

सर्प मरून पडला.

बंडूचा जीव खालीं पडला.

काठीला धरून मेलेला सर्प बंडूनें घरीं आणला.

बंडूचा जीव वाघ्यामुळें वांचला असें पाहून सर्वजण वाघ्याचें कौतुक करूं लागले. बंडूची आजी तर आपलें सोवळेंओवळें विसरून वाघ्याला कुरवाळूं लागली. तें पाहून बंडूला समाधान वाटलें. आपला वाघ्या सर्वांना आवडूं लागला. आजीलाही आवडूं लागला हें पाहून त्याला अतिशय आनंद झाला.

आजी त्या दिवसापासून वाघ्याला जवळ घेऊं लागली. आणि वाघ्याही मांजरीच्या पोरांबरोबर खेळूं लागला.

कुत्रा आणि मांजरीचीं पोरें खेळत आहेत हें दृश्य बंडूच्या घरांत रोज दिसूं लागलें.

मात्र त्या दिवसापासून बंडूला रानावनांत फिरायला जायची बंदी झाली. झाडांवर दगड मारतां येईनासे झाले. आतां फक्त खळ्यांत कुत्र्याला घेऊन खेळण्याची त्याला परवानगी होती.

त्यामुळें त्याचा जीव बेचैन झाला होता. त्याचे वडील रोज सकाळीं बंदूक घेऊन रानांत शिकारीला जात. त्यांनाच आजी कां जाऊं देते अशी त्याची आईजवळ तक्रार होती. पण त्याची तक्रार सगळ्यांनीं हंसण्यावारी नेली.

त्यामुळें बंडू अस्वस्थ झाला होता.

शाळेला सुट्टी झाली होती आणि मनासारखें फिरायला तर मिळत नव्हतें.

ते दिवस वैशाख महिन्याचे होते. सायंकाळपर्यंत उन्हें कशीं कढत कढत असायचीं. घरांत थंडाई यावी म्हणून बंडूच्या वडिलांनीं खळ्यात मांडव घालण्याचें ठरविलें.

ज्या दिवशीं गडीमाणसांनीं बांबू आणि कळकीचे खांब आणून मांडव उभारला, त्याच दिवशीं वर बांधलेल्या एका आडव्या खांबावर एक चिमणी येऊन बसली.

मांडव कसा घालतात तें पहात बंडू वाघ्यासह बाजूला उभा होता. त्याची नजर त्या चिमणीकडे गेली. वाघ्याही तिच्याकडे पहात होता.

चिमणी इथें बसली, तिथें बसली. उडाली. पुनः आली. पुनः आली तेव्हां तिच्याबरोबर दुसरी एक चिमणी होती. तो बहुधा चिमणा असावा असा बंडूनें तर्क केला.

नवीन चिमणीनें खांबाच्या पोकळींत डोकावून पाहिलें. दोन्ही चिमण्या मग भुर्र उडून गेल्या.

थोड्या वेळानें त्या पुनः आल्या. त्यांच्या चोंचींत आतां गवताच्या काड्या होत्या.

त्या काड्या त्यांनीं इकडे तिकडे पहात खांबाच्या पोकळींत नेऊन ठेविल्या.

असा क्रम सारखा चालला होता. थोड्याशा अवधींत त्यांनीं इतकें गवत आणून तेथें भरलें कीं बंडूला वाटलें—चिमणीनें तेथें घर केलें आहे.

त्या दोन चिमण्या त्यांत राहूं लागल्या. बंडूला आतां एक नवा

उद्योग मिळाला. तो रोज तेथें जाऊन घरटें पाहूं लागला. त्या चिमण्या पहिल्या–पहिल्यानें त्याला घाबरत. पण पुढें पुढें त्या धीट बनल्या. बंडू त्यांच्या जणुं ओळखीचाच झाला. त्या त्याला घाबरेनाशा झाल्या.

त्यांचें घरटें जाऊन पहाण्याची बंडूला उत्सुकता लागली होती. पण मांडवावर चढणे त्याला शक्य नव्हतें.

त्यामुळें चिमण्याच्या हालचाली खालून जेवढ्या पहातां येतील तेवढ्या तो पाहून घेत होता.

वाघ्या कुत्रा तर आतां नेहमीचा त्या घरट्याच्या खांबाखालीं पडलेला असायचा. चिमण्यांची जाग आली कीं तो सारखा त्यांच्याकडे टक लावून पहात बसे. खांबावर चढण्याचा प्रयत्न करी. आणि मग इकडे तिकडे नाचत सुटे; ओरडे.

आजी नेहमी म्हणायची, " एकाद दिवशीं त्या चिमण्याची वाघ्या चटणी करणार ! "

" आजी चटणी करणार म्हणजे काय ग ? " बंडूनें विचारलें.

" खाऊन टाकणार ! "

" अंऽहं !–" कपाळाला आठ्या घालीत बंडू उत्तरला. त्याला ती कल्पना मुळींच आवडली नाहीं.

त्यानंतर काहीं दिवसाची गोष्ट. बंडू आणि वाघ्या खळ्यांत खेळत होते. बंडू आपली गलोल घेऊन झाडावरच्या खारीला दगड मारीत होता. पण खार कसली वस्ताद. तिने केव्हांच पोबारा केला होता. ती कुठेंतरी लपून, ' चिनुक् चिन् चिन् चिन् ' असा घोष करीत होती.

इतक्यात खांबावरच्या चिमण्यांनीं किलबिलाट केला.

बंडूनें तिकडे वळून पाहिलें. एक चिमणी उडून आंब्याच्या फांदीवर बसत होती.

बंडूला मोह आंवरला नाहीं. खारीनें त्याचा उत्साहभंग केला होता.

त्यानें गलोल सरसावून चिमणीवर दगडाचा नेम मारला. दगड आवाज करीत गेला.

वाघ्या पहात होता.

बंडूच्या दगडानें चिमणी रक्तबंबाळ होऊन खालीं पडली.

वाघ्या तिकडे धांवला. क्षणभर त्यानें चिमणीकडे पाहिलें, आणि तो परत धांवत बंडूकडे आला.

त्यानें बंडूच्या पायाचा कडकडून चावा घेतला.

बंडूनें किंकाळी मारली.

त्याचा पाय रक्तबंबाळ झाला होता.

वाघ्या रक्तबंबाळ चिमणीजवळ जाऊन उभा राहिला. तो तिचें अंग हुंगूं लागला.

बंडूच्या किंकाळीनें सारींजणें धांवून आलीं. रक्तबंबाळ चिमणी-जवळ वाघ्याला पाहून आजी ओरडली, " तरी मी म्हणतच होतें कीं त्या कुत्र्याला घरांत घेऊं नको म्हणून! पाहिलंस? चिमणीची चटणी केली त्यानं ती!"

" नाहीं ग आजी! मी मारलं चिमणीला, म्हणून वाघ्या मला चावला!" बंडू विव्हळत म्हणाला.

त्या दिवशीं वाघ्याला कुणी घरांत घेतलें नाहीं. तो बंडूकडे जाण्यासाठीं सारख्या येरझारा घालीत होता; पण त्याला गड्यानें हांकलून लावलें. बंडूच्या वडिलांना हा प्रकार समजतांच ते तर बंदूक घेऊन त्याला मारायला उठले.

पण वाघ्याचाच पत्ता नव्हता दोन दिवस. त्याला कोणी पाहिलें नाहीं.

बंडू बिछान्यावर पडून वाघ्याचाच विचार करीत होता. तो न भेटल्यामुळें त्याचा जीव खालींवर होत होता.

तो पळूनच गेला असा सर्वांचा समज झाला.

बंडूचा पाय आतां बरा होत होता.

त्यानंतर एकदां दुपारची गोष्ट.

घरांतलीं माणसें जेवणें झाल्यावर वामकुक्षी करीत पडलीं होतीं.

बंडूचे वडील ओटीवर झोंपले होते. थोडी झोंप घेतल्यावर ते तोंड धुण्यासाठीं बाहेर आले.

बाहेर आले ते पडवींतील दृश्य पाहून तेथेंच थबकले.

पडवींत बंडू मध्येंच बसला होता. वाघ्या कुत्रा त्याचे पाय चाटीत होता. आणि बंडू त्याच्या अंगावरून प्रेमभरानें हात फिरवीत होता.

जेथें वाघ्यानें बंडूच्या पायाचा चावा घेतला तेथील भाग वाघ्या आपल्या जिभेनें चाटीत होता.

बंडूच्या वडिलांनीं आपल्या आईला हळूच बोलावून आणलें आणि तें दृश्य दाखवलें. आजी कौतुकानें हंसून म्हणाली, "मेल्या, त्यावेळीं प्रेम कुठं गेलं होतं!"

आजीचे शब्द कानीं पडतांच बंडूनें आणि वाघ्यानें एकाच वेळीं मागें वळून पाहिले.

आई, आजी आणि वडील कौतुकानें पहात आहेत असें त्यांना दिसून आलें.

बंडूनें प्रेमभरानें वाघ्याला जवळ घेतलें.

---

# मुईचांफा २५

बागेंत शांतता पसरली होती. सारे वृक्ष आणि लता झोपीं गेलीं होतीं. गुलाबाच्या कळ्या साखरझोपेंत कांहींतरी गोड गोड स्वप्नें पाहून मद हास्य करीत होत्या. आतां थोड्या वेळानें फुलें उमलून त्यांचा सुगंध आपणास घ्यायला मिळेल म्हणून वारा इकडे तिकडे रेंगाळत होता.

रातराणी जागी होती. आकाशांतील नवलाख चांदण्यांची गंमत पहात ती राहिली होती.

इतक्यांत तिला कसला तरी आवाज ऐकूं आला. आणि तिनें खालीं वाकून पाहिलें —

एक लहानसा पांढराशुभ्र अंकुर जमिनीमधून हलके हलके वर येत होता. जणु नवी चांदणीच उदयाला येत आहे असें रातराणीला वाटलें.

अंकुर वरवर येत होता. नव्या सृष्टींत पहिलें पाऊल टाकतांना लहान मूल जितक्या नवलानें चोंहीकडे न्याहाळून पहातें तसा तो त्या बागेच्या सृष्टींत डोकावून पाहूं लागला.

बागेत सर्वत्र झुडुपें, मोठाले वृक्ष, लता आणि फुलें खुशाल विश्रांति घेत असलेलीं त्यानें पाहिलीं. त्याची दृष्टि वर अनंत आकाशाकडे गेली. विस्मयानें तो तर चकीतच झाला. तो मनात म्हणाला, ‘ केवढं हें विस्तीर्ण जग ! मी तर इवलासा ! ’

त्याची दृष्टि सभोंवारच्या वृक्षलताकडे गेली. आणि पुनः एकदां त्यानें आकाशाकडे पाहिलें !

“ मीही असाच—यांहूनही मोठ्ठा मोठ्ठा वाढेन ! उंच उंच आकाशांत जाईन ! त्या निळ्या छताला हात लावीन ! ”

उत्साहाच्या भरात तो वाढू लागला. रातराणी आश्चर्यभरानें पहातच राहिली. ती मनात म्हणाली, ‘ हा कोणता नवा वृक्ष उदयाला येत आहे ! ’

तिनें वायूच्या कानांत हळूच सांगितलें. वारा सळसळला. तो साऱ्या बागेंत इकडे तिकडे भिरीभिरी फिरला. प्रत्येकाच्या कानाशीं लागून तो कांहीं तरी कुजबुजला.

वृक्ष आणि लता आश्चर्यानें आणि कांहींशा भीतीनें डोळे वटारून पाहूं लागलीं.

छोटा अंकुर उत्साहाच्या कैफांत होता. त्याला उंच उंच होण्याची धुंदी आली होती. तो वाढत होता.

केळीला वाटलें – ही आपली एकादी बहीण तर नसेल ? तिनें

निरखून पाहिलें. पण त्याची जात निराळीच दिसली. आपलीं सारीं पानें हालवून तिनें हा आपला कोणीच नाहीं असें सर्वांना सांगितलें.

आंबा, फणस, जांभूळ यांसारखे मोठे वृक्ष मनांत कचरले. त्यांना भीति वाटली. आतां हा आपणांहूनही उंच उंच वाढणार! पारिजात, गुलाब, निशिगंध मनांत म्हणाले, 'आतां आमचं कसं होईल ?'

"नाहीं, नाहीं!" ते गदगदां हलून ओरडले, "असं आम्ही कधींच होऊं देणार नाहीं!"

अंकुराला त्यांची चाहूल लागली. त्यानें हळूच दृष्टी वळवून पाहिलें. सारेजण क्रुद्ध दृष्टीनें आपल्याकडे पहात आहेत असा त्याला भास झाला. तो कांहींसा घाबरला. दबलाही मागें थोडासा!

त्यांची दृष्टिभेट होतांच ते एकदम ओरडले, 'वाढूं नकोस! वाढूं नकोस!'

अंकुराच्या बालमनाला मोठी भीति वाटली. त्याचा चेहरा खिन्न झाला. त्याला घाबरलेला पाहून ते पुनः ओरडले.

'वाढूं नकोस! वाढूं नकोस!'

त्यानें इकडे तिकडे पाहिलें. आपल्या एकलेपणाची त्याला तीव्र जाणीव झाली. त्यामुळे तो आणखी मागें मागें खालीं खालीं-जाऊं लागला.

वृक्षांच्या चेहऱ्यावर कृष्णहास्य प्रकटलें. ते पुनः ओरडले:

'वाढूं नकोस! वाढूं नकोस!'

भीतीनें व्याकुळ झालेला बिचारा अंकुर थरथर कांपत जमीनदोस्त झाला.

पहांट झाली. मंद मंद गार वारा सुटला. चोंहीकडे सुगंधच सुगंध पसरला. त्या सुगंधांत एक नवीन, सौम्य आणि सुखकारक असा सुगंध येऊं लागला. तेव्हां सगळ्यांना नवल वाटलें!

त्यांनीं अंकुराकडे पाहिलें—

तेथें एक नाजूक फूल फुललेलें होतें.

ते उपहासानें उद्गारले 'ऊं! भुईचांफा!'

---